स्वातंत्र्य हा आपल्या शिक्षणाचा पाया असायला हवा! स्पर्धा, बक्षिसे आणि शिक्षेला त्यात स्थान असू नये. मुले पुस्तकातून लिहायला आणि वाचायला शिकतात. परंतु पुस्तकातील अर्थ त्यांना केवळ अनुभवातूनच समजून घेता येईल. पाठ्यपुस्तके पाठ करून परीक्षेत पास होणे म्हणजे खरे शिक्षण नव्हे. मुलांनी निरीक्षण व प्रयोग करून नवे ज्ञान मिळवायला हवे... शिकणे ही एक मजेची प्रक्रिया असावी आणि ती आयुष्याच्या वाटचालीचाच एक भाग असावी!





# मुलांसोबतचा प्रवास

## शोध- स्वत:चा आणि सृजनात्मक शिक्षणाचा

रघुबाबू

अनुवाद : सुजाता गोडबोले



# मुलांसोबतचा प्रवास

## शोध - स्वत:चा आणि सृजनात्मक शिक्षणाचा

रघुबाबू

अनुवाद : सुजाता गोडबोले

त्यावेळच्या 'सृजन स्कूल' मधील मुलांना

आणि ज्यांच्यामुळे जे. कृष्णमूर्तींच्या

शैक्षणिक विचारांचा माझ्यात विकास झाला त्या

श्री. एम. शिवराम

यांना समर्पित

# शिक्षण क्षेत्रातील शिक्षण

सृजन म्हणजे स्वातंत्र्य.

सृजनक्षमता असली की शिस्त येते.

स्वातंत्र्य हा आपल्या शिक्षणाचा पाया असायला हवा. स्पर्धा, बक्षीस आणि शिक्षेला प्रोत्साहन असूच नये. मुले पुस्तकातून वाचायला आणि लिहायला शिकतात. वास्तविक केवळ अनुभवातूनच ते पुस्तकात काय लिहिले आहे याचा खरा अर्थ समजून घेऊ शकतात. पाठ्यपुस्तके पाठ करून परीक्षेत पास होणे हा शिक्षणाचा निकष नव्हे. आणि तसा तो असूही नये. मुलांनी निरीक्षण केले पाहिजे, प्रयोग करायला हवेत, नवी क्षेत्रे धुंडाळली पाहिजेत... शिकण्याच्या या प्रवासाची मुलांनी मजा घ्यायला हवी आणि आयुष्यभर हा प्रवास चालूच रहायला हवा.

शिस्त म्हणजे काय हे तर मला माहितच नाही!

शिक्षकांनी मुलांना शिस्त लावावी अशी पालकांची अपेक्षा असते... कदाचित त्यांच्या दृष्टीने शिस्त म्हणजे मुलांनी मोठ्यांच्या विरोधात बोलू नये, वडीलधाऱ्याचा मान राखावा, शिवीगाळ करू नये, खोटे बोलू नये वगैरे. पण आपण जर वास्तव पाहिले, तर पालकच दारू पितात, अपशब्द वापरून शिवीगाळ करतात, पत्नीला मारहाण करतात, घर आणि आजूबाजूचा परिसर नीटनेटका ठेवण्याकडे लक्ष देत नाहीत. मुलांना सिगरेट आणि दारूच्या बाटल्या आणण्यासाठी पाठवणारे अनेक पालक मला माहित

आहेत. खोटे बोलू नये, धूम्रपान करू नये, चांगले वागावे, अशी शिस्त आणि नैतिकता शाळेने मुलांना शिकवावी अशी या पालकांची अपेक्षा असते! खरोखर मला तर समजतच नाही. जोपर्यंत पालकांचे मुलांशी वागणे बदलत नाही, तोपर्यंत मुलांनी चांगले वागावे, शिस्तीत रहावे अशी अपेक्षा ते कसे काय करू शकतात?

मला फक्त स्वातंत्र्यच माहित आहे!

स्वातंत्र्यच शिस्त लावू शकते!

स्वातंत्र्य असेल तर तुमच्या आजूबाजूच्या गोष्टींचं नीट निरीक्षण करण्याची, सजग असण्याची, दक्ष राहण्याची, विचार करण्याची आणि परस्परांतील नातेसंबंध समजून घेण्याची तुम्हाला उत्तम संधी मिळते... अनेक गोष्टी केवळ स्वातंत्र्य असेल तरच शिकता येतात. स्वातंत्र्यच नसेल, तर विचार, भाव-भावना या सर्वांवरच बंधने येतात. अर्थातच, मुलांना जेव्हा मोकळेपणा मिळेल, ते त्याचा पूर्ण वापर करतील, तेव्हाच ते आधुनिक जगाचे निर्माते होऊ शकतील.

शिक्षण म्हणजे आविष्कार.

विद्या मधील विदचा अर्थ आहे जाणणे, अनुभवणे.

...कशाचा आविष्कार?

...काय जाणणे?

...कशाचा अनुभव घेणे?

मुलांच्या भाव-भावना, त्यांचे विचार, त्यांची दु:खे, त्यांच्यात दडलेली कला-कौशल्ये, त्यांच्यातील मानसिक स्वाभाविकता अशा गोष्टींचं मुलांचं विश्व उलगडण्याची शाळेने त्यांना संधी द्यायला हवी. जेव्हा त्यांना त्यांची स्वत:ची ओळख पटेल, तेव्हा आपोआपच त्यांच्या आयुष्यात शिस्त येईल.

कुठल्या शाळेत याकडे लक्ष दिले जाते? सर्व शाळा, मुले आणि पालक हे स्पर्धा परीक्षांच्या जाळ्यात अडकलेले आहेत. आणि स्वत:ची ओळख न पटवून घेताच एकमेकांशी स्पर्धा करण्यात गुंतले आहेत.

आम्ही आमच्या मुलांना निसर्गापासून दूर ठेवण्याचा कधीच प्रयत्न केला नाही. निसर्गापासून आपण दूर कसे जाणार?

वास्तविक, निसर्ग हाच आपला खरा शिक्षक आहे. निसर्ग आणि वातावरणाकडून आपल्याला खूप काही मिळते आणि त्याच्याकडून बरेच शिकताही येते. याच्या बदल्यात आपण वातावरणाला काय द्यायचे आहे? ते ही आपल्याला निसर्गाकडून शिकायचे आहे.

मुलांना 'ध्यानधारणा' शिकवणे खूप कठीण आहे हे मलाही माहित आहे, पण ते अशक्य नाही. स्वत:ला समजून घेण्याचा तो एकमेव मार्ग आहे. त्यांच्या खोलवर दडलेल्या कौशल्यांना व्यक्त करण्याची ती एक प्रक्रिया आहे. ध्यानधारणा ही काही भावना नाही, तसेच तो काही एखाद्या धर्माचा किंवा धार्मिक गटाचा मक्ता नाही. त्याचे स्वरूप वैश्विक आहे. त्यातून केवळ आपली दडलेली कौशल्ये व्यक्त करण्याची संधी मिळते इतकेच नव्हे, तर त्यातून आपण स्वत:वर आणि आपल्या आजूबाजूच्या जगावर प्रेम करायला शिकतो. मुलांना ही जाणीव देण्याचा आम्ही शक्य तितका प्रयत्न केला.

मी काही शिक्षक नाही; मी मुलांच्या भावाप्रमाणे वागतो. आमच्या शाळेतली मुले पुरुष शिक्षकांना 'अण्णा' (मोठा भाऊ) आणि महिला शिक्षकांना 'आक्का' (मोठी बहीण) म्हणतात. शिकण्यासाठी आम्ही त्यांना मदत करतो. त्यांनी निर्मितीक्षम बनावे यासाठी आम्ही त्यांना मदत केली. प्रत्येक मूल ही एक स्वतंत्र व्यक्ती आहे आणि प्रत्येकाकडे आपली स्वत:ची अशी कौशल्ये आहेत. ही अंगभूत कौशल्ये ओळखून त्यांनी सराव करायचा आहे आणि त्यात प्राविण्य मिळवायचे आहे. या उद्देशाने आम्ही त्यांना मदत केली. विशेष म्हणजे मुलांकडून आम्ही खूप काही शिकलो, आम्ही त्याचा संकोच बाळगला नाही आणि त्यांनी आम्हाला त्यांच्याकडून शिकू दिले याबद्दल खरे तर आम्ही त्यांचे आभारी आहोत.

माझ्या लहानपणी मी रामभक्त होतो. जसजसा मी मोठा होऊ लागलो, तसे घरातील सर्व घटनांबद्दल मला प्रश्न पडू लागले. पदवीचे शिक्षण घेत असताना माझ्या मनावर निरीश्वरवादी कल्पनेचा पगडा होता. पदवी मिळण्यापूर्वीच मी 'क्रांतीकारी लेखकांच्या संघटनेच्या' संपर्कात आलो. परंतु, या सर्व प्रक्रियेत 'ध्यानधारणा' हा माझ्या आयुष्याचा अविभाज्य भाग बनला होता. धार्मिक श्रद्धांच्या आहारी न जाता ध्यानधारणेने मला सतत मार्ग दाखवला. नेमके केव्हा ते आता मला आठवत नाही, माझी जिद्दु कृष्णमूर्तींच्या विचारांशी ओळख झाली आणि मी त्यांची पुस्तके वाचली. माझा स्वत:चा मार्ग निवडण्यासाठी मला त्याची फारच मोठी मदत झाली.

मी विद्यार्थी असताना देखील त्याकाळचे शिक्षण, ते शिकवण्याची पद्धत इतकेच काय पण पाठ्यपुस्तके देखील- मला मुळीच आवडत नसत. त्याच वेळी आपण निराळ्या प्रकारची शाळा सुरू करायची असे मी ठरवून टाकले होते. जे. कृष्णमूर्तीच्या पुस्तकांमुळे माझ्या विचारांना आणखीच बळकटी मिळाली आणि समांतर शिक्षणाचा सल्लागार असा माझा विकास होण्यास त्याची फार मोठी मदत झाली.

मुलांना शिकवत असताना किंवा यत्कलच्या आर डी टी या शिक्षकांसाठीच्या शिक्षण संस्थेत शिकवत असतानाही कृष्णामूर्तींच्या शिकवणीतून माझ्या कामाची प्रेरणा मला कशी मिळाली आणि समांतर शिक्षणाच्या प्रवाहात मी सातत्याने नवे प्रयोग करून त्यांच्याकडे टीकात्मक दृष्टीने पहायला कसा लागलो याचे स्पष्टीकरण मला देता आले नाही. केवळ मी कोणती पद्धत अंगिकारली आणि त्यातून काय निष्पन्न झाले हेच मला सांगता आले.

शाळेत आणि शिक्षकांना शिकवताना मी जे प्रयोग केले ते सामन्यत: सारखेच होते. तरीही पल्लीपाडूच्या शाळेत केलेले प्रयोग त्यांची सखोलता आणि व्याप्ती यामुळे विशेष लक्षात राहण्याजोगे होते. माझी पद्धत तीच होती, म्हणजे शिक्षणपद्धतीचे एकत्रीकरण- यात बागकाम, शेतीचे काम व त्याचबरोबर संगीत, नृत्य, कलाविष्कार यांचा समावेश होता आणि त्याबरोबर मुलांना गडबड करण्याचे, लहान सहान तक्रारी वगैरे करण्याचे दोन्ही शाळांमध्ये संपूर्ण स्वातंत्र्य दिले होते. परंतु दोन्ही शाळांतील वातावरण एकसारखे नव्हते. यत्कलच्या शाळेतील प्रयोगांची माहिती मी योग्य पद्धतीने ठेवली नसल्याने मी फक्त पल्लीपाडूच्या सृजन शाळेबाबतच बोलणार आहे.

अकरा वर्षांखालील मुलांच्या बाबतीतच मी जे. कृष्णमूर्तीचे विचार प्रत्यक्षात लागू केले होते. त्यांच्या वापरात जर काही चुका राहिल्या असतील, तर त्यासाठी केवळ मीच जबाबदार आहे.

मी अत्यंत वाईट प्रकारच्या अस्वच्छ, निराशादायी, नरकासारख्या तेलगु माध्यमाच्या सरकारी शाळेत शिकलो याचा मला अभिमान आहे. यात ना मातृभाषेचे ज्ञान वाढले, ना इंग्रजी किंवा हिंदी सारख्या इतर भाषा शिकण्यासाठीचे कौशल्य अंगी आले. आंध्र प्रदेशाच्या निरनिराळ्या भागातील अर्धा डझन तरी वेगवेगळ्या शाळांमध्ये मी शिकलो. कोणत्याही शाळेत मला शारीरिक, मानसिक आणि अध्यात्मिक विकासाची संधी मिळाली नाही. या शाळांमधून मी फारच थोडे शिकलो. माझ्या आई-वडिलांकडूनही फारच कमी शिकलो. पण माझ्या मित्रांकडून, आजूबाजूच्या परिसरातून, वाचनालयातून, अनेक ठिकाणी जाऊन आणि निरनिराळ्या क्षेत्रातील अनेक लोकांना भेटून मात्र मी खूप काही शिकलो.

म्हणूनच, मी माझे अनुभव आणि कल्पना ज्या प्रकारे मांडत आहे, ती भाषा विशेष लालित्यपूर्ण नाही. माझे लिखाण दुरुस्त करण्यात प्रेमाने सहकार्य व मदत केल्याबाबत मी अनंतपूरचे श्री. एस. मोहमद शरीफ, व श्री, मधू यांचा ऋणी आहे. सर्व पुस्तिका एकत्रितपणे प्रकाशित केल्यासाठी मी ‘मंची पुस्तकम’च्या चमूचा आभारी आहे.

या पुस्तकातील अनेक लेख 'पाथवेज' मध्ये प्रकाशित झाले होते आणि एक-दोन लेख 'टीचर प्लस' यात प्रकाशित झाले होते. दिल्लीतील 'एज्युकेशन प्लानिंग ग्रुप' तर्फे प्रकाशित होणा-या 'पाथवेज' च्या सदस्यांनी आणि हैद्राबादहून प्रकाशित होणा-या 'टीचर प्लस' च्या संपादकांनी दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल आणि माझा अनुभव अन्य शिक्षकांसमोर ठेवण्याची संधी दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

पल्लीपाडूच्या सृजन स्कूल मधील मुले, कर्मचारी, संस्थापक व इतर मित्र, मचनूरच्या डेक्कन डेव्हलपमेंट सोसायटीची ‘पच्चा शाले’ (ग्रीन स्कूल), आणि अनंतपूरची ‘चिट्टी बाडी’ यांच्या शेतीवर आधारीत शिकवण्याच्या पद्धतीचा शोध घेण्यासाठी त्यांनी केलेल्या उदार सहकार्याबद्दल मी त्यांचे आभार मानतो.

रघुबाबू



# झाडाखालची शाळा

शाळेने मुलांना आपला व्यवसाय आणि जबाबदारी शोधण्यास मदत करावी...

ज्या मातीत ते आनंदाने, निर्भयपणे आणि तिचा एक भाग बनून वाढू शकतील अशी ती माती असावी.

जे. कृष्णमूर्ती

# आश्रम शाळा



उत्तर भारतात गांधीजींनी साबरमती आश्रम स्थापन केला. आंध्रप्रदेशातील नेलोर जिल्ह्यातील काही गांधीवादी मंडळींची पेन्नार नदीच्या काठावर आश्रम स्थापन करण्याची इच्छा होती. म्हणून नेलोर शहरापासून सुमारे १० किलोमीटर अंतरावर पल्लीपाडू इथे १२ एकर जमिनीवर त्यांनी 'पिनाकिनी सत्याग्रह आश्रम' सुरू केला. नारळ, आंबा, चिंच, चिकू, सुरु, अशा झाडांवर पोपट, घुबडे, मैना, खारी, आणि स्थलांतरीत सारस पक्ष्यांचे कळप यांची तिथे रेलचेल आहे. आश्रमाच्या आजूबाजूच्या शेतात वांगी, भुईमूग, भेंडी, मका, तीळ, खाऊची पाने अशी पिकं घेतली जातात.

गांधीजींनी या आश्रमाला दोनदा भेट दिली होती आणि काही काळ ते तेथे राहिलेही होते. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर गांधीवादी मंडळींचे काही कार्यक्रम तिथे काही काळ चालू होते. त्यानंतर काही खाजगी मंडळींनी तो आश्रम भाड्याने घेतला. ६० च्या दशकापासून हा आश्रम दुर्लक्षितच होता. लहान शेतक-यांनी या जमिनीचा ताबा घेतला आणि आश्रमाची वाताहत झाली.

१९८३ साली श्री. शिवराम आणि श्री. देवकुमार या दोन मित्रांनी या जागेला भेट दिली आणि त्यांनी पल्लीपाडू गावातल्या गरीब मुलांसाठी इथे शाळा सुरू करायचे ठरवले. श्री. शिवराम एक कवी आणि तत्वज्ञ शिक्षणतज्ज्ञ आहेत, त्यांना जे. कृष्णमूर्तींची भाषणे फार आवडतात आणि त्यांचे विचार शिक्षणात आणायला त्यांना आवडते. श्री. देवकुमार ऋषी व्हाली शाळेत विद्यार्थी होते!

त्यांनी हा मोडकळीस आलेला आश्रम परत बांधायला सुरुवात केली आणि त्याला नाव दिले 'सृजन स्कूल'. या टप्प्यावर इंग्लंडमधील शिक्षणतज्ज्ञ श्रीमती एलिनोर वैट्स यांची श्री. शिवराम यांना साथ मिळाली. ही एक प्रायोगिक शाळा होती. विशेष करून मुलांच्या शिक्षणासाठी स्वयंसेवी संस्थांना निधीची मदत करणाऱ्या 'एक्शन एड' या इंग्लंडस्थित संस्थेची त्यांना मदत मिळाली.

१९८३ ते १९८७ या काळात त्यांनी अनेक शैक्षणिक प्रयोग केले. त्यातून शिक्षणाची एक नवी दृष्टी मिळाली. शिकवण्यात एक सर्जनशीलता आली. अनेक विषय आणि कला-कौशल्ये यांचे एकत्रीकरण करण्यात आले. स्थानिक पातळीवर उपलब्ध असणाऱ्या टाकाऊ वस्तूंचा वापर करण्याची अनेक तंत्रे त्यांनी विकसित केली. ही एक निर्मितीक्षम शाळा होती. १९८७ साली निरनिराळ्या कारणांनी श्रीमती वैट्स यांनी शाळा सोडली. मग मी शाळेत आलो. आपल्या सोयीसाठी श्रीमती एलिनोर यांनी ही इंग्रजी माध्यमाची शाळा केली होती. मी तिचे माध्यम तेलगु केले. शिवराम व एलिनोर यांनी विकसित केलेली एकत्रित शिक्षणपद्धती पूर्वीप्रमाणेच चालू ठेवण्याचा आणि मुलांमधील सुप्त निर्मितिक्षमता जपण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला. राम नावाच्या आणखी एका शिक्षकासमवेत मी 'शेतीवर आधारीत शिक्षण' ही संकल्पना रूढ करण्याचा प्रयत्न केला. गावकरी आणि पालकांनी आमच्यासमोर अनेक समस्या उभ्या केल्या.

आश्रमाच्या इमारतीत आमची शाळा आहे आणि आम्ही राहतोही तिथेच. भोवतालच्या शांत आणि सुंदर निसर्गाच्या सानिध्यात आम्ही ध्यान करत असू. निसर्गाच्या निरव शांततेत मुलांना शिकवताना आम्ही ध्यान करतो. यश किंवा अपयश यांचा विचार न करता ध्यानधारणेला आमच्या आयुष्यात एक स्थान आहे, त्यातून आम्हाला वर्तमानाचे ज्ञान होते आणि आम्ही जे काही करत असू त्याची आम्हाला मजा घेता येते.

आमच्या शाळेत वर्ग नव्हते, पण चार गट होते. आश्रमाच्या आवारातील चार झाडांची नावे या चार गटांना दिली होती. जेष्ठ मुलांच्या गटाचं नाव होतं 'चिंच', या गटात शाळेची ४ वर्षे पूर्ण केलेली ९-११ वयाची मुले होती. दुस-या गटाचं नाव होतं 'नारळ'. त्यांची शाळेची ३ वर्षे पूर्ण झाली होती. तिस-या गटाचं नाव होतं 'चिकू' आणि त्यांची शाळेतील दोन वर्षे पूर्ण झाली होती. नवीन आलेल्या मुलांच्या गटाचं नाव होतं 'आंबा'.

या चार गटांची विभागणी मानसिक क्षमता आणि पातळी यावरून करण्यात आली होती. या शाळेत एक वर्ष पूर्ण झाल्यावर वरच्या वर्गात घालण्याची पद्धत नव्हती. मुलांच्या क्षमतेचे मूल्यमापन करण्याचे आमचे एक तंत्र होते, आणि आवश्यक ती पातळी गाठली की त्यांना वरच्या स्तरावर पाठवले जात असे. म्हणजे दर वर्षी त्यांच्या पातळीनुसार या गटांमध्ये अदलाबदल होत असे.

अस्तित्वात असलेल्या शिक्षणपद्धतीशी शाळेने कधीच तडजोड केली नाही. सध्याच्या शिक्षणपद्धतीने शाळेला मान्यता दिलीच नव्हती... सध्याच्या शिक्षणपद्धतीत मुलांमधील निर्मितिक्षमतेला वाव दिला जात नाही आणि नैसर्गिक बौद्धिक विकासाला अडथळा निर्माण केला जातो. त्याऐवजी विषयाच्या ज्ञानाकडे लक्ष न देता, काही उत्तरे पाठ करून किंवा परीक्षेत चुकीच्या मार्गांचा अवलंब करून वरचा क्रमांक मिळवण्यास त्यांना प्रोत्साहन दिले जाते असे आम्हाला वाटते. यापेक्षा सर्वात महत्त्वाचे म्हणजे, त्यामुळे मुले परावलंबी, भांडखोर आणि हल्लेखोर नागरिक बनतात. सध्याच्या शिक्षणपद्धतीत शारीरिक आणि बौद्धिक विकासासाठी नीरस शिक्षण दिले जाते. म्हणून सृजन स्कूलने आपला स्वतंत्र शिक्षणक्रम तयार केला होता. तो निसर्गाशी, जीवनाशी आणि समाजाशी निगडीत होता; मुलांसमोर येणा-या किंवा भविष्यात ज्यांना तोंड द्यावे लागेल अशा अडचणी, परिस्थिती आणि संघर्ष यांचा यात विचार करण्यात आला होता... थोडक्यात सांगायचे तर, यात मुलांच्या सर्वांगीण विकासाचा विचार करण्यात आला होता.

आपण मुलांना निसर्गापासून आणि सामाजिक जीवनापासून वेगळे करू शकत नाही. आपण निसर्गाचा एक भाग आहोत आणि त्याचबरोबर आपल्यावर समाजाची काही बंधनेही आहेत. पालकांकडून, गावातील राजकारणी लोकांकडून आणि शाळेच्या जमिनीचा ताबा घेतलेल्या लहान शेतक-यांकडून अनेक प्रकारचे दबाव आणण्यात आले. परंतु तरीही, विशेषत: शिकवण्याच्या पद्धतीत शाळेने कसलीच तडजोड केली नाही. या हेकेखोरपणामुळे आम्हाला अधिक सृजनशील बनण्यासाठी, नवे मार्ग चोखाळण्यासाठी आणि मुलांविषयी अधिक संवेदनशील बनण्याचे बळ मिळाले...

# शाळेचा दिनक्रम

शाळा ९ च्या सुमारास सुरू होते आणि ४५ मिनिटे असेम्ब्लीच्या कार्यक्रमात जातात. दररोज असेम्ब्लीसाठी एक कार्यक्रम निवडला जातो- गायन, नाटक, सर्वसाधारण चर्चा, वर्तमानपत्राचे वाचन, टेप रेकॉर्डर ऐकणे वगैरे.

असेम्ब्लीनंतर, ९:४५ ते १ या वेळेत सकाळच्या सत्रात अभ्यासाचे तीन तास होतात. दुपारी २ ते ३ पर्यंत आणखी एक वर्ग होतो, यात इंग्रजी, तेलगु, गणित, विज्ञान अशा विषयांचा अंतर्भाव असतो. मोठ्या वयोगटातील मुलांसाठी दररोज एक तास 'स्वयंशिक्षणासाठी' ठेवलेला आहे. दुपारच्या सत्रातील दुसरा तास कला आणि कौशल्यासाठी राखून ठेवला आहे. त्यात ते चित्रकला, मातीकाम, चिकटकाम, कुंभारकाम वगैरे शिकतात. त्यानंतर त्यांना झाडे लावण्यासाठी किंवा शेतीच्या कामासाठी खड्डे खणण्यासारखे श्रमाचे काम करावे लागे. त्यानंतर थोडा वेळ बागकाम. शेवटी खेळ... कधी कधी ते पेन्नार नदीवर पोहायला जातात.

शनिवारी अभ्यासाचे वर्ग नसतात. पण त्यादिवशी 'शनिवारचे चर्चासत्र' असते, त्यात वेगवेगळ्या विषयांची चर्चा करण्यात सर्व गट सहभागी होतात. काही विषय त्यांच्याशी, त्यांच्या कुटुंबांशी किंवा गावाशी संबंधित असतात, तर काही मुलांना स्वारस्य असणारे इतरही विषय असतात. कधी कधी अंधश्रद्धा, भीती, अशा वेगवेगळ्या विषयांवर भाषणेही होतात. अशा चर्चासत्रामुळे त्यांच्या आयुष्यात आणि आजूबाजूला काय घडत आहे याची मुलांना जाणीव होण्यास मदत होते. यातून मुलांच्या बौद्धिक प्रक्रियेचा विकास होतो. 'चिकू' गटातील प्रभाकर, चिन्ना नागराजू, आणि रमेश यांच्यासारखी लहान मुलेही यात हिरीरीने सहभागी होत असत. चर्चासत्रानंतर एक तास मुले वाचनालयात पुस्तके वाचत आणि त्यानंतर घरी जात. त्यानंतरचा वेळ शिक्षकांना आठवड्यातील कामाचा आढावा घेण्यासाठी व पुढील आठवड्यातील कामाची तयारी करण्यासाठी, शिकवण्याची साधने व कार्डे वगैरे बनवण्यासाठी उपयोगी असे. अधून मधून जवळपासच्या गावांना, शेतांना किंवा जत्रेला जाण्यासाठी सहलीही निघत असत.

# समुद्रावरील कविता

"आकाशात एखादं नाणं फेकलं असावं
तसा चंद्र समुद्रावर तरंगतो आहे!
चंद्राला पकडून त्याची पापी घेण्यासाठी
लाटा उचंबळताहेत!
उकळता भात ऊतू जावा तशा,
मिठाच्या राशींसारख्या, शर्यत जिंकण्यासाठी पळणा-या मुलांसारख्या
लाटा किना-याकडे झेपावताहेत!"
जया, ११ वर्षे, 'चिंच' गट



संध्याकाळी सहा वाजण्याच्या सुमारास समुद्रातून उगवत असल्याप्रमाणे चंद्रोदय होत होता. जया माझ्या शेजारी बसली होती. उगवत्या चंद्राकडे पाहण्यात तिची तंद्री लागली होती. चंद्राकडे पाहता पाहता ती कविता म्हणत होती. मी ही चंद्रोदय पाहत होतो आणि जया काय म्हणते ते घाईघाईने लिहून घेत होतो. अगाध सागराप्रमाणेच जयाचं काव्य देखील महाकाव्याप्रमाणे वाढत होते. ती विचारात गढून एकेक वाक्य म्हणत होती. अनेक उपमा आठवून ती म्हणत होती. समुद्राच्या लाटांसारखंच तिचं काव्य होतं:

"हे सागरा!
गर्व वाटावा असं तुझं सौंदर्य आहे
एखाद्या राक्षसाप्रमाणे
तू सर्वकाही आपल्याकडे ओढून घेतोस!
हे चंद्रा!
तू पाण्यात पडण्याचा विचार करतो आहेस का?
ते जमणार नाही
लाटा तुला विस्कटून टाकतात..."

तिच्या कवितेने तीन पाने भरली होती. ती म्हणाली, "आता आपण थांबूया," आणि ती समुद्रात खेळायला पळून गेली...

दोन स्वयंसेवी संस्थांमधील काही शिक्षक शिकवण्याच्या आधुनिक पद्धती शिकण्यासाठी आमच्या शाळेत आले होते. विशेषत: लिहिण्या-वाचण्याची पद्धत. ते एक महिनाभर शाळेत राहिले. एका पौर्णिमेच्या दिवशी शाळेतील मुले आणि हे प्रशिक्षणार्थी शिक्षक मायपडू किनाऱ्यावर पोहायला गेले. मुले यापूर्वी दोन-तीनदा समुद्रावर गेली होती. पण तरीही त्यांना तो नवीनच होता. लाटा आणि समुद्राची विशालता पाहून त्यांना आश्चर्य वाटले...

मुलांनी कपडे काढले आणि ते समुद्रात पळाले. ते पूर्णपणे नागडे होते. मुली कपडे घालूनच समुद्राकडे पळाल्या. लहान मुले खोल पाण्यात जायला भीत होती. पण मोठी मुले लाटांशी खेळत होती. मोठ्या लाटा त्यांचे कोवळे देह उंचावर नेत होत्या आणि अचानक खाली टाकत होत्या. मुले जर लाटांसमोर उभी राहिली, तर ती लाटेत ओढली जात होती. लाटा त्यांच्या पायाखालची वाळू ओढून घेत होत्या, आणि मुले पडत होती. पाण्याचा हा मजेशीर खेळ होता...

त्यांच्या आनंदाला पारावार नव्हता. जंगली सारखी मोठी मुलं समुद्रात दूरवर पोहत होती. सगळेच खुशीत होते. समुद्र देखील मुलांना आनंदाने नवे नवे धडे देत होता.

रमेश नावाच्या सात वर्षाच्या मुलाने आपला अनुभव पुढील शब्दांत मांडला:

"जोराच्या लाटांनी मारा केला
मुले एकमेकांपासून दूर गेली
चंद्राला वाटले:
'ही मुलं का मरताहेत?'
म्हणून तो सगळ्यांना पकडतो आहे
चंद्राला या नाचणाऱ्या मुलांना
प्रकाश द्यायचा आहे..."

प्रभाकरने समुद्राला विचारले:

“समुद्रा!

तुझा जन्म कुठे झाला?

छान छान शंख-शिंपले आणि मासे

तुझ्यातच आहेत!

समुद्रा!

तू का उचंबळतोस?“



'चिकू' गटाचा चिन्ना नागराजू सागराची प्रार्थना करतो:

“सागरा! तू आम्हाला मारतोस आणि गिळतोस

चंद्रा! तू सोनेरी तबकडीसारखा आहेस

तुझे किरण मोठ्याने आवाज करत

सागराला वर-खाली स्पर्श करतात

आणि तू सोनेरी-चंदेरी वाघासारखा आमच्यावर पडतोस

सागरा! तू मला सागराच्या मध्यावर का नेत नाहीस?

सर्व काही का दाखवत नाहीस?

संपूर्ण सागर का दाखवत नाहीस?

मासे, शंख-शिंपले आणि लाटा... कुठवर आहेत सर्वकाही?

सागरा! मला तुझ्या लाटांवर बसू दे"

जे काही असेल ती जाणीव आपल्याला प्रकर्षाने व्हायला हवी. कर्ता आणि कर्म एकरूप व्हायला हवेत, त्यांच्यात अंतर असू नये. हे एकच आहे, हे विशेष आहे, एकमेव आहे, या अत्युच्च आनंदातून निर्मितीची सुरुवात व्हावी. मुलांना जेव्हा अशा क्षणाची अनुभूती मिळते, ते खरे शिक्षण!

'चिंच' गटातला पेद्दा नागराजू समुद्रावर गेला की नेहमीच स्वत:ला प्रश्न विचारतो, कुतुहलाने तो समुद्रालाही प्रश्न विचारतो:

"लाटांना जेव्हा चंद्र दिसतो

तेव्हा त्या सिंहासारखी गर्जना करतात

त्यांना जेव्हा माणूस दिसतो

सागरा, तुझं पाणी का आटतं?

जेव्हा जेव्हा मी येतो

तोच प्रश्न का विचारतो?"

'नारळ' गटातला नारायण म्हणतो,

“सागरा! तू भिका-यांना खूप मदत करतोस

तू त्यांना शंख-शिंपले दिलेस

तर ते लोकांना देतात

लोक त्यांना अन्न देतात

भिकारी ते खातात

तुझी कायम आठवण ठेवतात..."





शाळेत नारायण एक खोडकर आणि आडदांड मुलगा आहे. पण आता त्याच्या मनातील सहानुभूती व्यक्त झाली आहे. शिक्षणाने राकट आणि आडदांड मुलांमधील देखील संवेदनशीलता, आणि नाजूक, कोवळ्या भावना व्यक्त होऊ द्याव्यात, मगच ते 'योग्य' शिक्षण ठरेल. मुलांमध्ये दडलेल्या मानवी भावनांना मुक्त करणे आणि मुलांना जबाबदार व्यक्ती बनवणे हेच शिक्षणाचे महत्त्वाचे उद्दिष्ट आहे.

मायपाडूच्या समुद्राने आमच्या मुलांना त्यांच्यात दडलेल्या अव्यक्त भावना सर्वांसमोर व्यक्त करण्याची अशी संधी दिली. या प्रशिक्षणार्थी शिक्षकांना अशा निर्मितिक्षम क्षणाची जाणीवच नसेल, तर त्यांना सृजनात्मक शिक्षणपद्धती कशी काय शिकवणार? सर्व राज्यभरात जी पाठ्यपुस्तके नेमलेली असतात त्यामधून मुलांची काव्यमय अभिव्यक्ती कशी काय पुढे येणार? ते शक्यच नाही.

# धरणीमाता

तेलगुचा वर्ग चिंचेच्या सावलीत सुरू झाला. मस्तान लहानशा टेबलावर पहुडला होता, पण गोष्ट मात्र अगदी लक्ष देऊन ऐकत होता. मल्लिकार्जुन, जंगली आणि नागराजू आपल्या टेबलावर बसले होते. जया आपलं शरीर माझ्या पायांवर टेकवून माझ्या हातातल्या पुस्तकात डोकावून पहात होती. बाकीची मुलं टेबलांसमोर जमिनीवर बसून गोष्ट ऐकत होती.

तीन दिवस मी रशियन लेखक चिंगिझ एटमातोव्ह यांनी लिहिलेल्या 'मदर अर्थ' या कादंबरीची गोष्ट सांगत होतो.

मस्तान एक काठी घेऊन त्याच्यापुढे बसलेल्या मुलांना डिवचत होता. मल्लिकार्जुनही बॉलपेनच्या टोकाने मुलींना टोचत होता. मधून मधून ते खोड्या काढणा-यांच्या तक्रारी करत होते. कधी कधी ते मस्तानवर ओरडत होते, "मस्तान! गाढवा!" अशा तक्रारी आणि खोड्या चालू असतानाही मी लक्षवेधी पद्धतीने गोष्ट सांगायचा प्रयत्न करत होतो. भांडणे हा मुलांचा स्वभावच आहे! एका दृष्टीने तो त्यांचा हक्कच आहे. मुलं भांडणार नाहीत तर कोण भांडेल? 'शिस्त' किंवा इतर कोणतेही नाव देऊन आपण हे कसं काय थांबवणार? माझ्या वर्गात मुलं जमिनीवर लोळतात, किंवा लिहायच्या टेबलावर बसतात किंवा काही खोड्या काढतात, परंतु सर्व वेळ ते गोष्ट मात्र अगदी मन लावून ऐकतात. आणि तेच तर गरजेचं आहे.

सामान्यत: आपण 'लक्ष देणारी मुले' म्हणतो तेव्हा हाताची घडी घालून चुपचाप बसलेली, शिक्षकांना प्रश्न न विचारणारी, डोळ्याची पापणी देखील न हलवता शिक्षकांकडे पहात वर्गात गप्प बसलेली मुले असा अर्थ आपल्याला अभिप्रेत असतो. वास्तविक ते केवळ शिक्षकाच्या ओठांच्या हालचालीकडेच पहात असतात, त्यांची मने दुसरीकडे कुठेही असू शकतात.

गोष्ट सांगताना मी अचानक थांबलो आणि मल्लिकार्जुनला विचारलं, "टोलागानाय कोणाशी बोलते आहे, आणि का बोलते आहे?"

एक क्षणही न घालवता मल्लिकार्जुनने उत्तर दिले आणि ते बरोबर होते. एकीकडे तो मुलींना चिमटे काढत होता, त्यांची चेष्टा करून वर्गात गोंधळ करत होता, पण मग तो ऐकत कधी होता? आणि त्याने उत्तर कसं दिलं?

मुलं स्वस्थ बसू शकत नाहीत! ते काहीतरी करत असतात, त्यात काही अर्थ असेल अथवा नसेलही, त्याचा इतरांना त्रास होतो का अशा गोष्टी त्यांच्यासाठी निरर्थक असतात... त्यांची इंद्रिये आश्चर्यकारक असतात... शिस्तीच्या नावाने मी त्यांना रागावलो नाही, पण शांतपणे सुचवले, त्यांनी खोड्या केल्या तर इतरांना त्रास होतो हे त्यांना समजावले.

सुमारे अर्धा तास मी त्यांना गोष्ट सांगितली, आणि अचानक मी खाली वाकलो आणि मूठभर माती हातात घेऊन मुलांना दाखवली आणि म्हटलं, "तुमचं जर या धरणीमातेवर प्रेम असेल, तर तिच्यावर कविता करा..."

मल्लिकार्जुन त्याची वही घेऊन निघाला आणि पंपाच्या शेडवर चढून बसला. आणखी दोन मुलं त्याच्यामागे गेली. जया आणि सुधीर पळत जाऊन शाळेच्या व्हरांड्यात बसले. काही गवतावर आडवी झाली. रवी आणि विजया चिंचेच्या झाडाखाली टेबलाशी बसले आणि लिहू लागले. २० मिनिटातच सगळी मुले आनंदाने ओरडत, पळतच माझ्याकडे आली. आम्ही परत झाडाखाली बसलो. प्रत्येकजण आपापल्या टेबलाशी बसून आपल्या कविता वाचून दाखवू लागले...

अनुराधाने तिची कविता प्रथम वाचली तेव्हा तिचे डोळे चमकत होते:

"धरणीमाते!
तू संस्कृती वाढू दिलीस!
सुरुवातीला माणसांना घर बांधणे माहित नव्हते
काही माहित नसलेल्या निरागस माणसांची तू काळजी घेतलीस
त्यांची संस्कृती जोपासलीस...
आमच्या लहानपणी आम्ही तुझ्या अंगावर खेळलो...
आमच्या डोक्यावर चिखल घेतला आणि एकमेकांना चिडवलं
हे धरणीमाते! तू खरंच आमच्या आईसारखीच आहेस..."

रवीला ऐकू येत नाही. त्याला कविता वाचायची होती. पण सगळ्यांनी एकाच वेळी वाचायचा प्रयत्न केला. म्हणून मग अनुराधा, मस्तान, जया या दणकट मुलांना पहिल्यांदा संधी मिळाली आणि रवीला शेवटी. मस्तान त्याची कविता वाचू लागला:

"आई!
मी मातीत लोळलो आणि खेळलो
तुझ्या हातात अंघोळ केली
परत एकदा नागडाच धुळीत पळालो."

मग विजयाने तिची कविता वाचली:

"धरणीमाते!

हे शेत

तुझ्या मांडीत बिया लपवतं

एकदा अंकुरलं की ते होईल

हिरवं आणि सुंदर...

ते सणासारखंच वाटतं..."

मल्लिकार्जुनला त्याची कविता शक्य तितक्या लवकर वाचून टाकायची होती, म्हणजे त्याला बाहेर जाऊन खेळता येईल! म्हणून तो घाईघाईने आणि मोठ्याने वाचू लागला:

"मी तुझ्यात जन्मलो

तुझ्यातच वाढलो

तुझ्यात एकरूप होतो

तू किती  उदार आहेस!

तुझं सत्व तू आम्हाला देतेस

आई! आम्हा सर्वांना तुझ्याबरोबर ने

ही घालमेल आम्हाला सहन होत नाही..."

मुलांची ही उत्स्फूर्तता कुठून येते ते आपल्याला माहित नाही.  प्रत्येकाचे आपले स्वतःचे अनुभव असतात. वर्गात मुलींना चिडवणा-या मल्लिकार्जुननेच ही कविता लिहिली आहे का? त्याला ही घालमेल नको आहे...

मुलांच्या निरागस मनांमध्ये अशी किती दुःखे, अश्रू आणि घालमेली दडलेल्या आहेत! त्यांना त्यांच्या आई-वडिलांची भीती वाटते.  त्यांचे आई-वडील त्यांना किती त्रास देत असतील? आजूबाजूच्या वातावरणाचा मुलांवर कितपत परिणाम होत असेल? आपल्या अडचणी तो कोणाला सांगत असतील?

रवीला जेव्हा त्याची कविता वाचायची संधी मिळाली, त्यावेळी वर्गात, म्हणजे चिंचेच्या झाडाखाली, त्याची कविता ऐकायला कोणीच नव्हते.  सगळे खेळायला निघून गेले होते.  पण मी रवीची कविता ऐकायला तिथे होतो...

"आम्ही तुझ्या डोक्यावर घरे बांधतो

आम्ही तुझ्यावरून जातो

झाडं, कुत्री, आणि सगळे प्राणी

तुझ्या मांडीवर जन्म घेतात

सगळा भार तुझ्यावरच पडतो

शहरं, देश वाढतच आहेत..."

आपण आपल्या मुलांना देशभक्ती कशी काय शिकवणार? आपण मुलांना दररोज राष्ट्रगीत गायला आणि शपथ घ्यायला लावतो, पण केवळ शपथ घेऊन आणि राष्ट्रगीत गाऊन ती देशभक्त होतील का? ताठ उभे राहून राष्ट्रध्वजाला सलाम करण्याने कोणी देशभक्त बनतात का? त्यांना सामाजिक जबाबदारीचं भान येतं का? मुलांना 'प्रेम', 'समर्पण', 'देशभक्ती' याबद्दल माहित नसते... पण मुलं गातात, खेळतात, भांडतात, खोड्या करतात, मारामारी करतात, चिडवतात... शिक्षकांनी त्यांच्यातील हे नैसर्गिक स्थायीभाव समजून घेऊन त्यानुसार आपला कार्यक्रम बनवायला हवा.

मुले कशाहीबाबतच्या आपल्या तीव्र भावना व्यक्त करू शकतात हे वरील कवितांनी सिद्ध करून दाखवलेच आहे. मुलं भांडतील, खोड्या करतील, पण त्यांना योग्य शिक्षण मिळाले, तर ते आपल्या जबाबदाऱ्या कधीच विसरत नाहीत... शिक्षक आणि पालकांसमोर हे मोठे आव्हान आहे... मुलांना त्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या ओळखता आल्या नाहीत तर ते कसे चालेल?

**चिंचेचे झाड**

चिंचेच्या झाडाला बहर आला आहे. या चिंचांना आंबट-गोड अशी एक खास चव आहे. हे खूप जुने आणि प्रचंड झाड आहे. मुले यावर चढू शकत नाहीत. पण त्यांना ही फळे चाखायची आहेत. या एकुलत्या एक निरागस झाडावर ते सर्वजण दगड फेकत होते.  आराम करण्यासाठी हे झाड केवढी मोठी सावली देते, आणि आपल्या गरजा भागवण्यासाठी या झाडाचा अनेक प्रकारे उपयोग होतो हे विसरून सर्व मुले झाडाला दगड मारताहेत.

मुलांना काहीतरी खायला हवे आहे. त्यांच्याकडे जर काही खाऊ असेल, तर ते तो मुळीच गमावणार नाहीत.  ज्यांना झाडावर चढता येते ते फार स्वार्थी आहेत, ते आपल्यापुरती फळं काढतात पण ती आपल्या मित्रांना मात्र देत नाहीत.  त्यांना जे काही मिळालं असेल, त्यातील एक-दोनच फळं ते आपल्या जवळच्या मित्रांना देतात. बाकीच्यांकडे ते लक्षही देत नाहीत...

जंगली आणि विजया यांच्यासारखी मुलं काहीशी निराळी होती. ते झाडावर चढले की ते प्रथम आपल्याला हवी तेवढी फळे घेतात आणि त्यानंतर ते आणखी फळे तोडून इतरांसाठी खाली टाकतात. झाडाखाली उभी असलेली मुलं मग धडपडून ती गोळा करतात. कधी कधी यावरून त्यांच्यात भांडणेही होतात. ज्यांना काहीच मिळाले नसेल, ते मग ज्यांना फळं मिळाली असतील त्यांची मनधरणी करतात.

पण सुधीर सारखी बुजरी मुलं आहेत, त्यांना झाडावर चढताही येत नाही आणि फळं मिळवण्यासाठी भांडताही येत नाही किंवा विनवणी करून मागताही येत नाही, ते कुणीतरी मदत करायला येईपर्यंत बाजूलाच उभे राहतात. सुधीरचा जवळचा मित्र नागराज हे ओळखून आहे, जेव्हा त्याला बरीच फळं मिळतात, तेव्हा तो त्यातली काही सुधीरला देतो.

सामन्यात: मुलांचं मानसशास्त्र वेगळंच असतं. ते खातील का नाही हे निराळं, पण त्यांना पुष्कळ जमवायला आवडतं. त्यांना जे आवडतात, त्यांना ते एक तुकडा देतील. नाहीतर ते एक फळही कोणाला देणार नाहीत. मिळतील तेवढी जमवण्यात त्यांना अभिमान वाटतो. त्यातच त्यांना मोठेपणा वाटतो आणि इतरांकडे ते तुच्छतेनेच पाहतात. इतरांना ती चिडवतील पण आपला 'खजिना' काही कोणाला देणार नाहीत! कितीही वाईट वागणूक मिळाली तरी झाड काही तक्रार करत नाही आणि माणसांवर औदार्याचा वर्षाव करतच राहते!

मी पळतच गेलो आणि झाडाला दगड मारू नका म्हणून त्यांना रागावून, ओरडून सांगितलं. मी विचारलं की कुणाला झाडावर चढता येतं, म्हणजे त्यांनी फळं काढून ती शाळेतल्या सगळ्या मुलांना सारखीच वाटून द्यावीत. मी पहात असताना त्यांनी त्याप्रमाणे केलं, पण मी तिथून निघून गेल्यावर मात्र झाडावर चढू शकणाऱ्या स्वार्थी मुलांनी परत आपल्या मनासारखंच केलं!

मी आणि इतर शिक्षकांनी झाडाला दगड मारण्यापासून मुलांना परावृत्त केलं आणि त्याऐवजी फळं देण्यासाठी झाडाची प्रार्थना करून मग झाडावर चढून शाळेतल्या सगळ्या मुलांसाठीच फळं तोडून ती सर्वांना वाटा असं त्यांच्यावर बिंबवण्याचा प्रयत्न केला. पण मुलांना काही ही कल्पना समजलीच नाही! मी जेव्हा सांगतो की झाडंही जिवंत असतात, तेव्हा ते नुसतंच ऐकून घेतात आणि परत क्रूरपणेच वागतात... सर्व प्राणीमात्रांबाबत, विशेषत: झाडांबद्दल त्यांना संवेदनशील बनवण्याचा आम्ही शक्य तेवढा प्रयत्न केला... पण त्यांनी आपलं वचन पाळलं नाही.

त्याला काय करावं?

मुलांना सर्व प्राणीमात्रांबाबत संवेदनशील, दक्ष आणि जागरूक कसं बनवायचं? त्यांची वृत्ती बदलून त्याजागी सहानुभूती, निसर्गाप्रती आणि सर्व विश्वाप्रती दयाभाव, माया कशी विकसित करायची? भांडण, स्वार्थीपणा, यांचे वाईट परिणाम त्यांना कसे समाजवायचे आणि त्यांना प्रेमाची अनुभूती कशी द्यायची?

गोष्टी सांगून आणि गाणी गाऊन काहीच परिणाम झाला नाही.

नीतीमत्तेबाबत बोलून काहीच उपयोग झाला नाही.

चर्चा करूनही काही फायदा झाला नाही.

शिस्तीची कारवाई करूनही परिस्थितीत काही फरक पडला नाही.

मग काय करायचे...?

**शिस्त म्हणजे काय?**

"ही काय गडबड आहे? हा वर्ग आहे का?" चिंचेच्या झाडाखालचा वर्ग पाहून जयाच्या वडिलांना आश्चर्य वाटले आणि थोडासा रागही आला. त्यांनी मुलांना धमकावले, "मुलांनो, नीट बसा आणि धड्याकडे लक्ष देऊन ऐका..." आणि आपल्या शेताकडे निघून गेले. मी त्यांच्याकडे पाहून नुसताच हसलो, मग मुलांकडे वळून त्यांना विचारले,

"आता तुम्ही म्हणता की संक्रांत हा शेतक-यांचा सण आहे. ठीक आहे. पण कसा?

"कारण...."

जयाने माझा पाय ओढला.

नारायण उठून पळत माझ्याकडे आला आणि माझे खांदे ओढू लागला.

विजया हात वर करून ओरडू लागली कारण तिला प्रथम उत्तर द्यायचं होतं.

मल्लिकार्जुन उभा राहिला आणि इतर मुलांवर वाकला कारण त्यालाच पहिल्याने उत्तर द्यायचं होतं.

त्यालाच प्रथम संधी मिळावी म्हणून मल्ली माझी विनवणी करू लागला.

सुधीर त्याच्या टेबलासमोर बसून हळूच हसत होता.

प्रत्येक मुलालाच उत्तर द्यायची घाई झाली होती. मुलांच्या उत्तर देण्याच्या घाईमुळे आणि उत्साहामुळे हा वर्ग आहे असे दिसतच नाही- या संवादाच्या पद्धतीमुळे आणि गडबड-गोंगाटामुळे ही गावची जत्रा आहे असेच वाटते! मुलांनी जरी खोड्या करण्याचा प्रयत्न केला तरी त्यांचा सर्वांचा या संवादात सहभाग असतो. इतरांच्यात विशेष न मिसळणारी सुधीरसारखी मुलेही गप्प बसत नाहीत. त्यांची मते जाणून घेण्यासाठी मी सर्वांना सहभागी करून घेतो. त्यासाठी मला मुलांचा उद्धटपणा सहन करावा लागतो- एकजण माझे खांदे ओढतो, कोणीतरी पाय खेचते, तर आणखी कोणीतरी माझ्या गुडघ्यावर चापट्या मारते- ही सगळी गावातली मुले आहेत!

प्रत्येकाला त्याच्या कौटुंबिक चालीरीतींच्या आणि आजूबाजूच्या वातावरणाच्या अनुभवातून याचे उत्तर माहित असते आणि प्रत्येकाचे स्वत:चे असे उत्तर असते. सर्वांचाच अनुभव समृद्ध असतो. पण आपला अनुभव शब्दांत मांडताना मात्र त्यांचा गोंधळ उडतो. विशेष म्हणजे काही तरी सांगण्याची सगळ्यांनाच घाई असते. त्यांना काही फार विचार करून, तर्कसंगत उत्तरच द्यायचे असते असे नाही, पण जे काही त्यावेळी सुचेल ते बोलण्याची त्यांना घाई असते.

माझ्या शिकवण्याच्या पद्धतीचा हा पाया आहे... मी मुलांच्या भावासारखा आहे. धडा वाचणारा, अर्थ स्पष्ट करणारा, उलट अर्थाचे शब्द वगैरे सांगणारा आणि प्रश्नोत्तरे पाठ करायला सांगणारा शिक्षक नाही. प्रथम, मी मुलांना काय माहित आहे ते जाणून घेतो, मग ते सुसंगत पद्धतीने मांडतो आणि मग या 'ज्ञात' गोष्टींकडून आमचा 'अज्ञाताचा' प्रवास सुरू होतो- तर्कदृष्ट्या आणि तत्वज्ञानाच्या दृष्टीने देखील. मला वाटते की हा शिकवण्याचा योग्य मार्ग आहे.

चिंचेच्या झाडाखाली किंवा एखाद्या खोलीत मी जेव्हा वर्ग सुरू करतो, मी त्यांच्यासमोर अनेक शंका मांडतो - मग आवाज सुरू होतो. मुले अर्थातच भांडतात, पण त्यातूनच ती विचारही करायला लागतात. सगळ्यांनाच काहीतरी म्हणायचे असते. मल्ली फार सावकाश विचार करते आणि त्यानंतर तिचे उत्तर येते. तिला आपण ताबडतोब उत्तर द्यायला सांगू शकत नाही. कधी कधी तर ती संध्याकाळी शाळेत परत येऊन उत्तर देते. काही वेळा ते दुसऱ्या दिवसाच्या सुरुवातीला त्यांची निरीक्षणे सांगतात...

या पद्धतीने खरे म्हणजे इतर वर्गांना त्रास होतो. आवाजाचा इतर शिक्षकांनाही त्रास होतो. जयाच्या वडिलांप्रमाणे या बेशिस्त वर्गाचा रागही येतो. पण काय करणार? या प्रकारेच ते विचार करायला शिकतात, त्यांना खरे शिक्षण मिळते असे मला वाटते.

# शिक्षणाची एकात्मिक पद्धत

## संक्रांतीचा उपक्रम




जानेवारी १९८८ मध्ये आमच्या शाळेने संक्रांतीच्या सणाच्या निमित्ताने एक उपक्रम हाती घेतला. हा शेतकऱ्याचा सण आहे, गावातील लोकांचा सण आहे, मुलांचा सण! या सणाचा मुलांचा अनुभव समृद्ध आहे आणि शिक्षकांनी त्याचा उपयोग करून त्याच्या अनुषंगाने हस्ताकलांसह इतर विषयही शिकण्याची संधी द्यायचे ठरवले.

हा उपक्रम आठ ते दहा दिवस चालला. मुले जेव्हा शाळेत येतील तेव्हा सगळीकडे संक्रांतीचं वातावरण असेल याची आम्ही काळजी घेतली. सर्व विषय आणि सर्व कार्यक्रम संक्रांतीशी संबंधीतच असणार होते. यात मुले वैयक्तिकरित्या आणि गटागटाने देखील निर्मितिक्षम मूडमध्ये असावीत अशी आमची अपेक्षा होती, आणि काही वेळा तरी त्यांनी आपली सर्व उर्जा आपल्या गटासाठी वापरावी अशी आमची इच्छा होती. त्यांच्यातील कलागुणांना, मनातील भावभावनांना आणि त्यांच्या जगाला मोकळेपणाने व्यक्त होता यावे यासाठी शिक्षक त्यांचे मदतनीस असणार होते.

दोन दिवस चर्चा केल्यानंतर आमची योजना तयार झाली. त्याची रूपरेषा पुढे दिली आहे:

**तेलगू आणि इंग्रजी**: संक्रांतीविषयी कविता वाचणे आणि लिहिणे; संक्रातीची प्रतीके असलेल्या सजवलेल्या बैलांविषयीची व हरिदास, बुडबुक्काल या जमातीतील लोक या निमित्ताने गात असलेली गाणी व त्यांची माहिती वगैरे. पहिल्या दिवशी भोगी; दुसऱ्या दिवशी संक्रांतीचा समारंभ; तिसऱ्या दिवशी किंक्रांत; रांगोळ्या; कोंबड्याची झुंज; नव्या तांदुळाची खीर बनवणे; सणासंबंधीच्या अंधश्रद्धा, अपशकून वगैरे.

**विज्ञान**: सूर्य व ग्रह; पृथ्वी सूर्याभोवती फिरते की सूर्य पृथ्वीभोवती फिरतो? राशी व नक्षत्रे; सूर्य मकर वृत्तात कसा प्रवेश करतो?

**समाजविज्ञान**: दिनदर्शिका; पिके; ऋतू...

**गणित**: क्षेत्रफळ; आकार; नमुना; समतोल; भागाकार; मिळकत आणि खर्च...

**हस्तकला**: शाळेचे आवार रांगोळ्यांनी आणि कागदी पताका वगैरेनी सजवणे.

**रंगकाम**: रंगांचे मिश्रण करणे, भोगीच्या होळीचे चित्र काढून ते रंगवणे; सजवलेल्या बैलाचे चित्र काढणे; गोब्बी नाच, कोंबड्याचे खेळ, भोगीची अंघोळ, घरांची रंगसफेदी; नव्या तांदुळाची खीर बनवणे, पशुधनाचे पूजन वगैरे.

**एकत्रितपणे करण्याचे उपक्रम**: कुटुंबाप्रमाणे एकत्र सण साजरा करणे; सजवलेले बैल घेवून येणारे, बुडबुक्काल, यनादि वगैरे जमातीतील लोकांच्या प्रातिनिधिक नकला आणि गोब्बी नाच...

## हिरवी संक्रांत एकदाच आली

## आणि ती रडत आली

“शाबास! तुम्ही संक्रांतीबद्दल खूप गोष्टी सांगितल्यात. तुमच्याकडून मला पुष्कळ माहिती मिळाली. आता काही तरी करण्याची वेळ आली आहे. पण आपण काही लिहिण्याआधी मला काही कविता वाचून दाखवायच्या आहेत...” मी म्हणालो.

त्याबरोबर नारायण एका तेलगु नाटकातील एक गाणे मोठ्याने म्हणू लागला! मी हसतच त्याला थांबवलं आणि महाकाव्यातील काही कविता वाचून दाखवल्या. मुलांना त्या आवडल्या नाहीत! मग मी मुलांना म्हटलं, “या कविता तुम्हाला आवडल्या नाहीत तर काही हरकत नाही. तुम्ही अशा कविता लिहू शकाल का?”

सगळेच विचारात पडले. विजया, रवी, मल्ली, मल्लिकार्जुन थोडा वेळ डोळे मिटून गप्प बसले, मग ते त्यांच्या कल्पना शब्दांत गुंफू लागले.

चिंच गटाच्या जंगलीनं त्याची कविता आणली:

“आला! आला!<br>
संक्रांतीचा सण आला!<br>
आता खर्च आला!<br>
तांदुळाचा खर्च<br>
गोडधोड बनवण्याचा खर्च...<br>
आता हातात काहीच पैसा उरला नाही!<br>
पण तरीही कोंबडीचा रस्सा खायला मजा आली!!”

जंगली सगळ्याचाच पैशाच्या दृष्टीकोनातून विचार करतो, तो गरिबीचा आणि त्याच्या अडचणींचा विचार करतो...

क्रिस्तय्या नेहमी नकारात्मक विचार करतो:

“हिरवी संक्रांत रडत रडत आली<br>
आम्ही मिठाई बनवत असताना ती रडत रडत आली<br>
आमची सगळी मिठाई तिनेच खाऊन टाकली<br>
या रडक्या हिरव्या संक्रांतीबरोबरच<br>
धुकं देखील आलं!<br>
मग आम्ही भोगीची होळी पेटवली<br>
कारण रडणारी हिरवी संक्रांत धुकं घेऊन आली होती.”

नारायणाने एक लहानसा संवाद लिहिला होता:

“मी: भाऊजी, उठा! आई म्हणाली की उठा आणि भोगीची होळी पेटवा.<br>
भाऊजी: थांब रे! अजून सूर्य उगवला नाही.<br>
मी: उठा! नाही तर आई तुम्हाला मारेल.<br>
भाऊजी: थांब रे!

(भाऊजीना परत झोप लागली आणि ते उठले नाहीत.)

मी: आई! भाऊजी उठले नाहीत. थोडं पाणी आण...

आई: पाणी! कशाला ते?

मी: आधी आण, मग तुला सांगतो.

आईने पाणी आणले. मी भाऊजीच्या तोंडावर पाणी शिंपडले. ते उठले... ताई जोरात हसली! भाऊजी उठून पळाले आणि भिंतीमागे जाऊन लपले."

आयुष्यात अनेक गोष्टी घडत असतात. प्रत्येकाची स्वत:ची पार्श्वभूमी निराळी असते. त्याला अनुसरूनच ते उत्तर देतात. शाळेने अशी उत्तरं देण्याची संधी द्यायला हवी! भाषा कोण शिकवणार? वाङ्मय कोण शिकवणार? मुलांनाही खूप माहित असते. त्यांना सर्व समजते. शाळेत जर त्यांना योग्य संधी मिळाली, तर ते निश्चितच महान कलाकार, मोठे शास्त्रज्ञ वगैरे होतील. पण आपल्या मुलांना अशा संधी आपण देत आहोत का?

## संक्रांतीविषयीची चर्चा

चिंचेच्या झाडावरून पक्षी आवाज करत होते. खारी एकमेकींना पकडण्यासाठी झाडावरून जमिनीवर आणि जमिनीवरून झाडावर पळण्याच्या खेळात रंगल्या होत्या. मुले चिंचेच्या झाडाखाली जमली आणि आमच्या गप्पा सुरू झाल्या...

मी: म्हणजे तुझ्या बहिणी, भाऊजी आणि दुसऱ्या गावात राहणारे नातेवाईक या सणासाठी तुमच्या घरी येतात. बरं, पण मला सांगा, सण म्हणजे काय? त्याचा अर्थ काय?

मुले: आम्ही सगळे जमतो, एकमेकांना भेटतो...

मी: मग..

मुले: आम्ही घराची रंगसफेदी करतो.

-घर रंगवतो, आणि घरात आणि घराबाहेर सुद्धा रांगोळ्या काढतो.

-जनावरांची पूजा करतो.

-गोडधोड बनवतो.

-नवे कपडे घालतो.

मी: हे सगळं मला माहित आहे. पण मला सांगा सण म्हणजे काय?

मुले: आम्ही सगळे आनंदी असतो, मजा करतो आणि सगळे मिळून खेळ खेळतो.

मी: पण आनंदी म्हणजे काय?

मुले: ... ...?

मी: बरं. तुम्ही केव्हा आनंदी असाल?

मुले: जेव्हा आम्हाला मजा येते, जेव्हा आम्ही खूष असतो...

मी: म्हणजे, तुम्ही खूष असलात की तुम्ही आनंदी असता. खूष असलात की तुम्ही खेळता, गाणी म्हणता... तुम्ही जर एकटे असलात तर खूष असता की सगळ्यांच्या बरोबर असलात की खूष असता?

मुले: एकत्र असलो की खूष असतो.

मी: का? एकटे असलात तर तुम्ही का खूष नसता?

मुले: एकटं असलं की बोलायला कोणीच नसेल; खेळायलाही कोणी नसेल, मग आम्हाला कंटाळा येईल.

मी: तसं असेल, तर कंटाळा आला की जाऊन झोपा.

मुले: असे किती वेळ झोपणार?

मी: मग नुसते बसा, काहीच करू नका.

मुले: असं कसं? इतरांशी बोललो की आम्ही खूष होतो. कोणाशी न बोलता एकट्यानं बसणं म्हणजे चांगलं असतं का?

मी: म्हणजे तुम्ही इतर लोकांबरोबर असलात की तुम्ही खूष! बरं. पण फक्त तुम्ही आणि तुमचे नातेवाईकच नाही, तर सगळं गाव खूष असेल, सगळ्यांनी नवे कपडे घातले, मिठाई खाल्ली... तर मग...

मुले: मग तो सण असेल...

मी:     सण म्हणजे?

मुले:     सगळे आनंदी असतील...

मी:     सण म्हणजे, फक्त एकच माणूस किंवा काही थोडी माणसंच नव्हे, तर सर्व गाव आणि संपूर्ण देश आनंदी असावा आणि सर्वांनी आनंदात रहावे... मग तो सण होतो... मल्लिकार्जुन, तुझ्या घरचे लोक सण कसा साजरा करतात?

मल्लिकार्जुन:   कुठला सण?

मी:   कुठलाही सण, उदाहरणार्थ, संक्रांतीचा सण घेऊया...

मल्लिकार्जुन:   आम्ही तो तीन दिवस साजरा करतो. पहिल्या दिवशी आम्ही सकाळी लवकर उठतो, भोगीची होळी पेटवतो 'तेगस' (ताडाच्या झाडाचे कोवळे कोंब) उकडतो, म्हणजे थंडीत आम्हाला उब मिळते.

मी:    भोगीची होळी कशी असते?

मुले:   होळी आकाशाला भिडते. ती लाल रंगाची असते.

मी:    त्यानंतर तुम्ही काय करता?

मुले:   आम्ही तेल लावून अंघोळ करतो.

मी:    ही अंघोळ कशी असते?

मुले:    आम्ही रिठे घेउन डोक्यावरून अंघोळ करतो.

मी:    तुम्ही डोक्यावरून अंघोळ करायला रिठेच का घेता? दुसरं काही का घेत नाही?

मुले:    कारण त्यानं तेल निघून जातं आणि केस स्वच्छ होतात.

मी:    धूळ आणि तेल केसातच राहिलं तर काय होईल?

मुले:    मग डोकं दुखायला लागेल.

मी:    डोकं दुखलं तर काय होईल?

मुले:    काहीही दुखलं तर ते आपल्या आरोग्यासाठी चांगलं असणार नाही.

मी:    अंघोळ झाल्यावर तुम्ही काय कराल?

मुले:    अंघोळ झाल्यावर आई नवे कपडे देईल. ते घालून आम्ही मित्रांना भेटू, आनंदाने त्यांच्याशी खेळू...

हा संवाद अशाच तऱ्हेने चालू राहील. त्याला कुठे निश्चित सुरुवात नसेल आणि शेवटही नसेल! कोणालाच कसलाही संकोच नसेल. मुलांना आपली मतं मांडायची असतात, त्यांना जे काही माहित असेल ते आणि घरी ते जे काय साजरं करतात ते त्यांना इतरांना सांगायचं असतं. शिक्षकाने संयम ठेवून त्यांना पुरेसा वेळ द्यायला हवा आणि मुलांशी योग्य पद्धतीने संवाद चालू ठेवायला हवा. नाहीतर त्यांना कंटाळा येतो. यात काही पाठ्यपुस्तके आणि धडे नसतात. शिकवणंही नसतं. व्याख्या स्पष्ट करायची नसते आणि मुलांना काही पाठही करायचं नसतं. मुलांचे अनुभव हेच आपलं पाठ्यपुस्तक. ते विचार करू शकतात. ते आपलं मत बनवू शकतात; ते स्वतः नव्या व्याख्या तयार करू शकतात आणि त्या इतरांना सांगायला त्यांना आवडते... त्यांना खूप काही माहित असते!

भाषण केल्यासारखं शिकवत गेलं तर मुले कंटाळतात, त्यांचे लक्ष उडून जाते. पण अशा प्रकारच्या संवादातून मुलांना विचार करायला आणि उत्तर द्यायला मदत होते. माहित नसलेल्या गोष्टी ओळखायला, समजून घ्यायला त्यांना मजा येते. पण अर्थात, मुले गडबड करतात, भांडतात, खोड्या काढतात, आणि हे सगळं चिंचेच्या झाडाखाली घडते, कारण ती एक मोकळी जागा आहे, वर्ग नाही. इतर मुलांना चिडवण्यासाठी काटक्या, दगड, माती अशा अनेक गोष्टी त्यांच्या अवतीभोवती आहेत. कधीकधी ते खारीच्या मागे पळतात, पक्ष्याना उडवून लावतात, आजूबाजूला काही मजेचं घडलं तर तिकडे पहात बसतात... बंद वर्गात त्यांना हे सर्व कसं काय मिळेल?



# संक्रांतीतून गणित

“या सणासाठी तुमच्या आईने मिठाई बनवली असणार. त्यासाठी काय काय सामान लागलं?” गणिताच्या वर्गात रमाने मुलांना विचारले.

विजयाने सांगितले, “एक किलो तांदूळ, पाव किलो गूळ आणि अर्धा किलो तेल वगैरे.”

“हे सामान आणायला किती खर्च आला?”

मुलांनी मग त्याची यादी केली:

| | |
|---|---|
| एक किलो तांदूळ | २ रुपये |
| पाव किलो गूळ | २ रुपये |
| अर्धा किलो तेल | १२ रुपये |
| एकूण | १६ रुपये |

विजयाच्या घरी खीर बनवण्यासाठी १६ रुपयांचा खर्च झाला. पण त्यांनी दोन –तीन प्रकार केले होते. प्रत्येक मुलाने त्याच्या आईने काय गोड पदार्थ केला होता, त्यासाठी काय काय सामान लागलं आणि त्याला किती खर्च आला याची यादीच केली.

“मोराची रांगोळी काढायला किती ठिपके लागतात?” रमाने मुलींना विचारले. आणि ती पुढे म्हणाली, “त्याला किती जागा लागेल? तुम्ही तुमची रांगोळी दोन फुटाच्या जागेत काढलीत की चार फुटाच्या जागेत?”

शाळेच्या पुढच्या अंगणात रमाने चार चार फुटांचे चौकोन आखले. मुलांनी सुंदर रांगोळ्या काढून अंगण सजवलं आणि त्यात रंग देखील भरला.

प्रत्येक रांगोळीला लागलेले ठिपके; रांगोळीतले चौकोन; त्यातील निरनिराळे आकार; प्रत्येक रांगोळीला किती जागा लागली; किती रंगीत पावडर वापरली; वगैरे.. या सर्व गोष्टी ते प्रत्यक्षच शिकले.

आता नेहमीच्या गणिताच्या पुस्तकांकडे पहा: प्राथमिक शाळेतल्या मुलांना देखील किती व्याख्या आणि सिद्धांत पुस्तकातून शिकवले जातात. तिसरीच्या पुस्तकात ८-९ वर्षांच्या कोवळ्या मुलांना संख्यामान, एकांकसंख्या, वियोगकं, शेषं, सहज विलव्ह, स्थान विलव्ह यांसारख्या संस्कृतप्रचुर संज्ञा पाठ कराव्या लागतात...

प्राथमिक शिक्षणाच्या स्तरावर अशा न समजणाऱ्या तांत्रिक संज्ञा देण्याची खरी गरज आहे का? अशा क्लिष्ट शब्दांखेरीज साध्या, सोप्या भाषेत मुलांना सहज समजतील अशी पाठ्यपुस्तके तयार करता येणार नाहीत का? मुलांना गणिताची गोडी लावण्याचा दुसरा काही मार्ग नाही का? मुलांच्या वातावरणाची शिक्षकाला जाणीव नसेल, तर मुलांना शिकवणे खरेच कठीण होते आणि शिकवलेले समजून घेणे मुलांनाही कठीण जाते.

गणिताच्या पुस्तकातील कोणताच धडा मुलांच्या रोजच्या आयुष्याशी आणि वातावरणाशी निगडीत नसतो. गणित म्हणजे रसहीन, कंटाळवाणा आणि नकोसा विषय...! शिवाय मुलांच्या मनात त्याची भीती बसते. परीक्षेत पास होण्यासाठी मुलांना संज्ञा आणि सिद्धांत पाठ करावे लागतात. बऱ्याच मुलांसाठी गणिताची परीक्षा म्हणजे युद्धातला मोठाच पराभव ठरतो. जवळ जवळ ७० टक्के मुले गणितात नापास होतात. आणि त्यानंतर क्रमांक लागतो दुसरी भाषा म्हणून शिकवलेल्या इंग्रजीचा!

पण रमाने गणित सोपे केले. तिने ते त्यांच्या अनुभवाचा एक भाग बनवला. त्यांच्या रोजच्या आयुष्याशी गणिताची सांगड घालून, संज्ञा आणि सिद्धांत पाठ न करता तिने ते सहजपणे आत्मसात करण्याची त्यांना संधी दिली. भाषेप्रमाणेच गणित देखील त्यांच्या रोजच्या जीवनाचा भाग आहे. हे साधणे हा खरंच फार मोठा, अनुभव होता.

# थोडा वेळ मुलेच ग्रह झाली

तुम्ही जर तेलगुचं पाठ्यपुस्तक उघडलेत तर तुम्हाला लिहिलेले दिसेल:

“... संक्रांतीला सूर्य मकर राशीत प्रवेश करेल...”

तुम्ही जर सामाजिक शिक्षणाचं पुस्तक उघडलंत तर त्यात लिहिलं असेल:

“... सूर्य आणि तारे आपली जागा सोडत नाहीत. पृथ्वी आणि इतर ग्रह सूर्याभोवती फिरतात...”

अर्थात भाषेचे शिक्षक जुन्या आणि परंपरेनुसार विचार करणारे असल्याने अजूनही ते सूर्य व चंद्राला ग्रहच मानतात. युरेनस आणि नेपच्यून हे आपल्या ग्रहमालेतील ८वा व ९वा ग्रह आहेत हे तरी त्यांना माहित आहे की नाही कोण जाणे! ते अजूनही पुराणातले राहू आणि केतू हे ग्रह आहेत असेच शिकवतात! दिवसा राहू सूर्याला गिळून टाकतो तेव्हा सूर्यग्रहण होते असेच ते शिकवतात. भाषेची पाठ्यपुस्तके हाच विचार मांडतात.

भाषा, सामाजिक शास्त्र आणि विज्ञान या विषयांच्या पाठ्यपुस्तकामुळे गोंधळ उडतो असे तुम्हाला वाटत नाही का? आपली पाठ्यपुस्तके असत्यावर आधारित आहेत आणि विज्ञानाबाबतचे अज्ञान दर्शवतात असे दिसत नाही का? शिवाय, भाषा आणि विज्ञानाच्या पाठ्यपुस्तकांच्या लिखाणात आणि विज्ञानाच्या शिक्षकांमध्ये समन्वय नसल्याचे सहज लक्षात येते. त्यांच्या समोर असलेल्या पाठ्यपुस्तकांनुसार ते आपला अभ्यासक्रम शिकवतात. आणि परीक्षेत पास होण्यासाठी मुलांना हे धडे पाठ करावे लागतात. आपली मुले अवैज्ञानिक, अवास्तववादी आणि गोंधळलेले विचार घेऊन मोठी होत आहेत असे तुम्हाला वाटत नाही का?

मी १२ मुलांना एका वर्तुळात उभे केले आहे. एक मुलगा या वर्तुळाच्या मध्यभागी उभा राहिला आहे. एक मुलगी मध्यभागी उभ्या असलेल्या मुलाभोवती गोलाकार फिरत होती. हा मुलगा म्हणजे सूर्य. त्याच्याभोवती प्रदक्षिणा करणारी मुलगी पृथ्वी. वर्तुळातील १२ मुले म्हणजे १२ राशी. हेच चित्र मी फळ्यावर काढले.

अचानक मी पृथ्वीला थांबायला सांगितले. पृथ्वी थांबली! मी विचारले:

“विजया, तुला मस्तान दिसतो का? तो कुठे आहे?

विजया म्हणाली, “मस्तान जयाच्या समोर आहे.”

“मग, मस्तान जर सूर्य असेल, आणि जया म्हणजे कन्या रास असेल, तर तो कसा वाटतो?”

विजयाने उत्तर दिलं, “सूर्य कन्या राशीच्या समोर आहे...”

मग पृथ्वी परत सूर्याभोवती फिरू लागली. ती अधून मधून थांबत होती आणि त्यावरून सूर्याचे स्थान समजत होते. या खेळात सूर्य आणि राशी एकाच ठिकाणी स्थिर होते, फक्त पृथ्वीच फिरत होती...

“पृथ्वी, तुला सूर्य कुठे दिसतो ?”

“आता तो मकर राशीत दिसतो आहे...”

“म्हणजे, पृथ्वीच्या फिरण्यामुळे आपल्याला वाटतं की सूर्य निरनिराळ्या राशीत जातो आणि महिनाभर त्या राशीतच प्रवास करतो. म्हणून आपल्याला वाटतं की संक्रांतीच्या दिवशी सूर्य मकर राशीत प्रवेश करतो...”

काही काळासाठी मुलं ग्रह आणि राशी बनले! विश्वाच्या अंगणातील विविध आणि गुंतागुंतीच्या हालचालीचा त्यांनी प्रत्यक्ष अनुभव घेतला!



# मुलांची चित्रे हा नवचित्रकलेचा पाया आहे

गायीच्या पाठीवरची मदार बघ... ती पोटातल्या बाळासारखी दिसते की नाही?” मुलांनी एकत्रितपणे काढलेल्या एका चित्राबद्दल मणी आपल्या आईला समजावून सांगत होता.

“हे पाय बघा, मी काढलेत,” मल्लिकार्जुननं आपल्या वडीलांना सांगितलं. गायीचं शरीर आणि डोकं त्या पायांवर नाही आहे. ते त्या प्रचंड गायीच्या पोटात सामावून गेले आहेत...

ही महाकाय गाय सर्व मुलांनी मिळून रंगवली होती. ३x२ मीटर आकाराच्या चौकोनाच्या सगळ्या बाजूंना मुले बसली होती. त्यांनी सगळ्या बाजूंनी उभ्या असलेल्या, बसलेल्या, चालणाऱ्या मुलांची चित्रे काढली होती. अखेरीस श्री. लुई कुक आणि श्री. दानियेल सोल नावाच्या संक्रांतीच्या वेळी शाळा पहायला आलेल्या दोन ब्रिटिश कलाकारांनी ती जोडली आणि त्या चित्राची एका रूपरेषा बनवली. ती एका प्रचंड गायीसारखी दिसू लागली!



उभ्या असलेल्या एका मुलाचे पाय गायीचे मागले पाय दिसत होते आणि ते मल्लिकार्जुनने काढले होते.  दुसऱ्या एका मुलाचे हात गायीची शिंगे असल्याप्रमाणे दिसू लागले. आणखी एकाची बोटे गायीचे आचळ बनले! गायीच्या या मोठ्या चित्रात उभी असलेली, बसलेली आणि झोपलेली मुलं होती. हे सर्व त्यांनी एकत्रितपणे केलं होतं.

आणखीही काही चित्रे होती—भोगीच्या दिवशी अंघोळ करणारी मुले; घराच्या पुढल्या अंगणात रांगोळी काढणाऱ्या मुली, सजवलेल्या बैलांबरोबर असणारी माणसे; भिकारी; बैलांची  शिंगे रंगवणारी माणसे; घरांची रंगसफेदी; मिठाई बनवताना; गोब्बी नाच; कावळ्यांना खीर देताना; कोंबड्याची झुंज; खीर बनवताना; जनावरांची पूजा करताना अशी अनेक चित्रे होती. हा उपक्रम पूर्ण झाल्यावर मुलांनी काढलेल्या चित्रांचं शाळेत एक प्रदर्शन मांडण्यात आले. पालकांना ते पहायला बोलावलं होते आणि आपली चित्रे मुलांनी पालकांना समजावून सांगितली! ३० हूनही अधिक चित्रं पाहून त्यांना आश्चर्य वाटले.

रोजच्या असेम्ब्लीच्या वेळी मुले संक्रांतीची गाणी गात होती; कविता वाचत होती; गोष्टी सांगत होती; नाटुकली करत होती. अभ्यासाच्या वर्गाच्या वेळचा अभ्यास संक्रांतीशी संबंधित होता. तेलगु आणि इंग्रजीच्या वर्गात मुलं कविता आणि निबंध लिहित होते. विज्ञानाच्या वर्गात ते ग्रह आणि राशीबद्दल शिकत होते. गणिताच्या वर्गात संक्रांतीविषयीच्या कार्यक्रमातून ते हिशेब शिकत होते.

पहावे तिकडे संक्रांतीचे वातावरण होते. अशा सृजनात्मक वातावरणात मुलांनी संक्रांतीशी संबंधित उत्तमोत्तम कलाकृती बनवताना आठवडाभर अपार परिश्रम घेतले. त्यांनी प्रसिद्ध कलाकारांची नक्कल केली नाही किंवा कुणाचं पाहूनही चित्रे काढली नाहीत. पाहुणे ब्रिटिश कलाकार किंवा शाळेतले शिक्षक यापैकी कोणीही त्यांना चित्रं काढायला किंवा रंग मिसळायला मदत केली नाही. मुलांना काहीही सूचना दिल्या नाहीत की काही सुचवले नाही.

प्रत्येक मुल हे खरे कलाकारच असते.  प्रत्येकाने आपल्या कल्पनेने चित्रे रेखाटली. जे त्यांना आवडलं ते त्यांनी आपल्या शैलीत काढलं. काहींनी रंग भरताना कागदावर उड्या मारल्या, काही जण पालथे पडून रंगवत होते, तर कोणी शांतपणे मांडी घालून एकाग्रतेने रंगवत होते. रमेश आणि प्रभाकर सारख्या काही मुलांच्या चेहऱ्यावर आणि पायावर रंग पसरला होता. काहींच्या कपड्यांना आणि अंगाला रंग लागला होता. अब्दुल्ला आणि नारायण सारख्या मुलांनी शेजारच्या मुलांना रंग लावला होता आणि त्यांच्याकडे पाहून हसत बसले होते. मुलांनी आपले गट बनवले आणि रंगवायला सुरुवात केली. विजया मुळातच कलाकार आहे. सुधीरला तिनं तिच्याबरोबर येऊ दिलं नाही, कारण तो तिचं चित्र खराब करेल अशी तिला भीती वाटत होती, म्हणून ती एकटीच बसली होती. प्रत्येक मुलाला चित्रासाठी मर्यादित जागा दिली होती. हेमलताला ती पुरेशी वाटली नाही म्हणून तिने इतरांची जागा बळकावण्याचा प्रयत्न केला, पण शेजारच्या मल्लिकार्जुनने त्याला हरकत घेतली.

शेवटी, मुलांनी एरवी दिसणार नाहीत अशा उत्कृष्ठ कलाकृती निर्माण केल्या. त्यात काही नियम नव्हते, ताल नव्हता आणि समतोल देखील नव्हता.  प्रत्येक वस्तू, प्रत्येक नाद, प्रत्येक विचार त्यांच्या कल्पनेतून उगम पावला होता. त्यांचे कसब ओबडधोबड होते, पण सुंदर होते.

सहसा पालकांना वाटते की संपूर्ण वेळ मुलांवर लक्ष ठेवले नाही, त्यांच्यावर अंकुश ठेवला नाही तर ती बिघडतात. पण असे करताना ते मुलांच्या अवकाशावर अतिक्रमण करत आहेत, त्यांच्या सृजनशीलतेला, कल्पनाशक्तीला आणि त्यांच्या स्वाभिमानाला देखील हानी पोचवत आहेत हे त्यांच्या लक्षातच येत नाही. मुळातच मुले निर्मितिक्षम असतात. शिक्षण हे त्यांच्यात दडलेल्या कौशल्याला व्यक्त होऊ देण्याचे, त्यांची योग्य तशी वाढ होऊ देण्याचे, त्यांना अद्यावत माहिती देण्याचे एक साधन आहे.

पाब्लो पिकासोने म्हटले आहे, "लहान मुलासारखं चित्र काढता येण्यासाठी मला आयुष्यभर शिकावं लागलं."

मुलांनी काढलेली चित्रे हा नवचित्रकलेचा पाया आहे. दोन ब्रिटिश चित्रकारांनी एक आठवडा मुलांबरोबर राहून त्यांच्याकडून नवनवी चित्रे काढून घेतली. दररोज मुलांबरोबर तीन तास काम केल्यावर ते दमून जात असत. याउलट, मुलांना चित्रे रंगवण्याचा कधीच कंटाळा आला नाही! लुई अजिबात संकोच न करता स्पष्टच म्हणाला, "मुलांबरोबर केवळ तीन तास घालवून आम्ही दमतो आहोत. तुम्ही सर्वजण संपूर्ण दिवस मुलांबरोबर असता, त्यांच्या खोड्या आणि भांडणे सहन करता, तुम्ही दमत नाही का?"

शिकवणे हा काही व्यवसाय नाही! ते एक सृजनात्मक काम आहे.

आपल्यापैकी किती जणांना मुलांबरोबर वेळ घालवायची संधी मिळते?

आपल्यापैकी कितीजण मुलांना त्यांच्यातील सृजनात्मकतेला व्यक्त होण्यासाठी आणि सर्वांगीण विकास साधण्यासाठी मदत करतात?

# मुलांनी अश्लील भाषा वापरलेली चालेल का?!

शाळा अजून सुरू झालेली नाही. लवकर आलेली मुले वेगवेगळे खेळ खेळत होती. कुणी चिंचेच्या झाडाची पाने तोडत होते. काही मुले झाडे वाढली आहेत का ते पहायला बागेत गेली. दोन मुलं तेलगू वर्तमानपत्रात पाहून त्या दिवशीच्या बातम्या फळ्यावर लिहित होती. मी पायरीवर बसून मुले काय करत आहेत ते पहात होतो.

मुलगे विटीदांडू खेळत होते, त्यांच्यात वाद झाला आणि ते एकमेकांशी भांडू लागले. मस्तान लहानग्या प्रभाकरला त्याच्या जातीवरून चिडवत होता... ए! धोबी..."

प्रभाकरही काही गप्पा बसणारा मुलगा नव्हता. त्यानेही मस्तानला त्याच्या जातीवरून बोलायला सुरुवात केली, "तू, कापूसनिवड्या..."

पेद्दा नागराजूला त्यांचे भांडण मिटवायचे होते, पण इतर मुलांनी त्याच्या म्हणण्याकडे लक्ष दिले नाही आणि नागराजूला, "ए कोष्ट्या... तू कशाला मध्ये पडतोस?" असे म्हणून ओरडायला सुरुवात केली. नागराजू मग तिथून निघूनच गेला.

नेमके तेव्हाच सैलाचे वडील माझ्याकडे आले. त्यांनी मुलांच्या शिव्या ऐकल्या आणि ते मुलांना रागावले, "तुम्ही शाळेत शिकायला येता ना? असं कुणालाही त्याच्या जातीवरून आणि धर्मावरून शिव्या द्यायच्या नाहीत..."

ते माझ्याकडे आले, पायरीवर माझ्या शेजारी बसले आणि माझ्याकडे तक्रार केली, "हे पहा, आम्ही मुलांना चांगली, सुसंस्कृत भाषा आणि चांगलं वागायला शिकण्यासाठी तुमच्या शाळेत पाठवतो. घरात आम्ही गावठी भाषा वापरतो. खरं सांगायचं तर ते बरं नाही. मुलांना तुमची भीती वाटायला हवी. मुलं जर शिक्षकांना घाबरली नाहीत, तर ती काहीच शिकणार नाहीत आणि ती वाया जातील." ते त्यांच्या पारंपारिक शिक्षणाच्या अनुभवातून बोलत होते.

मी हसून म्हणालो, "हो, ते खरं आहे. तरीही मुलांना रागवावं की नाही हे मला ठरवता येत नाही. अशी शिव्यांची भाषा वापरून कोणाला आपला राग व्यक्त करता येतो का? एखाद्या शिक्षकाला जर मुलांना रागवायचे असेल किंवा शिक्षा करायची असेल, तर त्याने शिव्या द्याव्यात का? मला माफ करा. पण आता मी तरी माझ्या मुलांना नैतिकतेचे धडे देऊ शकत नाही. त्यांनी त्यांच्या रागाच्या स्वरूपाचे, परीस्थितीचे आणि रागामागच्या मानसशास्त्राचे विश्लेषण करायला हवे, आणि चुका दुरुस्त करायला हव्यात... त्यांना मिळालेल्या स्वातंत्र्यातूनच त्यांना हे समजायला हवे. दर वेळेस जर तुम्ही त्यांना शिकवायला गेलात, त्यांच्या चुका दुरुस्त केल्यात, शिव्या देऊ नका असे सांगितलेत, तर त्यांच्या रागाला मोकळीक मिळणार नाही आणि त्यांना त्यांच्या भावनांचे स्वरूपही समजणार नाही..."

सैलाच्या वडिलांना माझं बोलणं कितपत समजलं मला माहित नाही. पण ते त्यांच्या मतावर ठाम होते.

शाळा सुरू झाली. असेम्ब्लीची सुरुवात झाली. मुलं एक मोठं वर्तुळ करून बसली. मी आणि रमा देखील मुलांतच बसलो. सगळ्यांनी मिळून एक समूहगीत म्हटले. थोड्याशा स्तब्धतेनंतर मी मुलांशी चर्चा करायला सुरुवात केली.

"ऐका! मी एक महत्त्वाचा विषय तुमच्यासमोर मांडणार आहे. तुम्ही त्याचा विचार करायचा आहे, त्याच्या सगळ्या बाजू समजावून घेऊन मग त्यावरून निष्कर्ष काढायचा आहे. तर विषय असा आहे..." मी जरा थांबून मग पुढे म्हणालो, "आपल्या शाळेत तुम्ही एकमेकांना त्यांच्या जातीवरून आणि धर्मावरून, "ए, धोब्या", "ए, कोष्ट्या" "ए कापूसनिवड्या" अशा शिव्या देत आहात. आता तुम्हीच सांगा, एकमेकांना अशा शिव्या देणं चांगलं आहे का? विचार करा... मग मला सांगा."

सर्वजण गप्प होते. काहींच्या माना खाली होत्या. काही जण आपल्या बोटांनी जमिनीवर रेघोट्या ओढू लागले...

जया शाळेतल्या कोणापेक्षाही अधिक वेळा शिव्यांचा वापर करते... ती हळूच म्हणाली, "आता ती सवय झाली आहे!"

मी म्हणालो, "इथे आणखीही एक विषय आहे. तुम्ही केवळ एकमेकांनाच शिव्या देत आहात असं नाही, तर "ए कुत्रीच्या पोरा..."

वगैरे सारखे अपशब्द वापरून तुम्ही तुमच्या आयांचा आणि बहिणींचा देखील अपमान करता. मी हे खूपदा ऐकले आहे. तुम्ही या शिव्यांचा कधी विचार केला आहेत का? केवळ घरातली मोठी माणसे अशी भाषा वापरतात म्हणून तुम्ही त्यांचे अनुकरण करत आहात का? याचा कृपया नीट विचार करा. आपल्याच आई-वडिलांना, नातेवाईकांना असे म्हणणे किती वाईट आहे याचा तरी विचार करा. तुम्ही त्यांचा अपमान नाही, तर त्यांना मान आदर दाखवायला शिकायला नको का? तुम्ही जर चांगले वागायला शिकलात, तरच तुम्ही आयुष्यात काही प्रगती कराल."

मी बोलतांना अपशब्दांचा वापर केला तेव्हा मुले हसू लागली...

चिकू गटातल्या रमेशनं भावपूर्ण उत्तर दिलं, "हो! आपण एकमेकांना जातीवरून शिव्या द्यायला नको. आपल्या कामावरून आपल्या जाती आल्या आहेत. म्हणून...

जया ओरडली, "सगळे पुरुष बायकांना का शिव्या देतात...?"

शाळेतल्या मुलांचे जातीवरून आणि धर्मावरून वर्गीकरण करून मी तिला समजावण्याचा प्रयत्न केला. त्या दिवशी धर्म, जात आणि स्त्रियांवरून एकमेकांना शिव्या द्यायच्या नाहीत असा मुलांनी निर्णय घेतला. अर्थात काही मुले अशीही असतात की ते वचन देतात पण ते कसे पाळायचे हे त्यांना समजत नाही...

खरंतर त्यांना दिलेला शब्द पाळायचा असतो, पण रात्रीच्या वेळी त्यांच्या वस्तीतील रस्त्यावरून दारूचा पूर वहात असतो आणि सगळीकडे मोठमोठ्याने शिव्या ऐकू येत असतात. माणसे दारू पितात, शिव्या देत बायकांना मारहाण करतात! रस्त्यात सगळीकडे घाण पसरलेली असते, सांडपाणी वहात असते, डुकरे, गाढवे आणि कुत्री त्यात फिरत असतात. अशा प्रतिकूल परिस्थितीत मुले त्यांचा शब्द कसा काय पाळणार?

## पेन्नार नदी देखील आपली शिक्षक आहे

मुले नदीच्या पात्राजवळून चालत होती. वाळूत मला हळदीसारखी काही झुडपं दिसली. मी भाबडेपणाने विचारले, "इथे हळद कुणी टाकली? हे पहा, ही हळदीची रोपं अगदी लहान आहेत..." मी ती माझ्या हातात घेतली आणि त्यांचे निरीक्षण करू लागलो. मुले मला हसू लागली आणि म्हणाली, "ही हळद नाही आहे! ती तशी दिसतात. थोडंसं दाबून पहा म्हणजे लक्षात येईल."

मी त्यातली एक दाबली, ती फुग्यासारखी फुटली. मुलांनी मला समजावून सांगितलं, "ही पाण्यातल्या झाडांची मुळं आहेत. त्यांच्यात औषधी गुणधर्मही असतात. तुमचं पोट दुखू लागलं किंवा अतिसार झाला, तर या मुळाची पूड करून पाण्यात मिसळून प्यायची..."

"म्हणजे ही मुळं औषध म्हणून वापरतात..."

"अण्णा! अण्णा! ही पाण्याखाली असलेली झाडं पहिलीत का? याची पानं रिबिनीसारखी आहेत..." मुलांनी मला नदीपात्रात ओढून नेलं.

व्हेलीस्नेरीया झाडांचे शेंडे पाण्याखाली हलत होते. "वनस्पतीशास्त्राचे विद्यार्थी याला व्हेलीस्नेरीया म्हणतात, गावात तुम्ही या झाडांना काय म्हणता?" मी त्यांना विचारले, पण त्यांना माहित नव्हते.

मी पाणी थोडे बाजूला केले. मुले माझ्याभोवती जमली. "तुम्ही ही झाडं कधी निरखून पहिली आहेत का? ती नर आणि मादी अशा दोन प्रकारची असतात हे तुम्हाला माहित आहे का...? मुलांना हे ऐकून आश्चर्य वाटले आणि ती झाडे तोडायला पुढे आली.

"थांबा, इतक्यात तोडू नका. अगोदर ती कशी आहेत ते नीट पहा. नर झाडांची फुलं झाडापासून वेगळी होऊन पाण्यावर कशी तरंगत आहेत पहा. परंतु मादी झाडांची फुलं मात्र खोडावरच टिकून आहेत. त्या खोडाकडे नीट लक्ष द्या – ते कसं आहे? एखाद्या स्प्रिंग सारखं आहे ना? ते तसं का आहे माहित आहे का?

मुलांना परागीकरण, फलधारणा वगैरे माहित नाही. मी त्यांना तिथेच सर्व स्पष्ट करून सांगितले. आणि मुले परत पाण्यात चालू लागली. मी आणखी एक वेगळ्या प्रकारची वनस्पती दाखवली... "याला हायड्रीला म्हणतात. आपण त्यांच्यावर अनेक प्रयोग करू शकतो." मुले रोज या नदीवर येतात. बऱ्याचदा ते नदीत पोहतात. विजया, चिन्न नागराजू ही धोब्यांची मुले आहेत, म्हणून ती नदीवर कपडे धुतात. पण त्यांचे या झाडांकडे लक्ष गेले नव्हते.

मुलग्यांनी कपडे काढले आणि नदीत जाऊन पोहू लागले. मुली कपडे घालूनच नदीत उतरल्या. तिथे त्यांनी बराच गोंधळ घातला, एकमेकांना पकडले, भांडले, कोण किती लांब पोहतो ते पाहायला शर्यत लावली, काहींनी पाण्याखाली सूर मारून इतर मुलांचे पाय ओढले, काही मासे त्यांच्या अगदी जवळून गेल्यावर मुले किंचाळू लागली, पोहता न येणारी लहान मुले घाबरून ओरडू लागली...

पाणी आणि वाळू पाहिली की मुलांच्या कल्पनाशक्तीला उधाण येते. त्यांनी वाळूत छोटे छोटे किल्ले केले आणि ते पाना-फुलांनी सजवले. त्यांनी वाळूत चित्रे काढली, आपले पाय गुडघ्यापर्यंत वाळूत दडवले आणि बाहेर काढायचा प्रयत्न केला- पण ते काही जमेना! कबड्डी आणि खो खो सारखे खेळही ते वाळूत खेळले.

मुलांनी बरेच शंख-शिंपले आणि गुळगुळीत दगड-गोटे जमवले आणि त्यांच्याबद्दल बराच वेळ बोलत राहिले. ते नदीत पोहले, काठावर येउन एकमेकांशी पकडापकडी खेळले, गाणी म्हटली, खेळ खेळले, नाचले, गोष्टींची नाटके केली... पेन्नार नदीवरचा त्यांचा अनुभव खूप समृद्ध होता... यातील प्रत्येक गोष्ट त्यांच्या कायम लक्षात राहील आणि भविष्यकाळात देखील त्यांना आठवेल.

पेन्नार नदीने मुलांना अनेक गोष्टी शिकवल्या... पाण्यातली झुडपं, मासे, शंख- शिंपले, मासे पकडणारे पक्षी, उन्हाळ्यात नदीच्या पात्रातील वाळूत वाढणारी काकड्या आणि कलिंगडे अशी झाडे, नदीच्या काठावर वर्षातून एकदा साजरा होणारा वेमन सण, जवळच्या कागदाच्या कारखान्यातील सांडपाण्यामुळे नदीच्या पाण्यात होणारे प्रदूषण वगैरे वगैरे...

पोहून झाल्यावर सर्व मुले बाहेर आली. नदीच्या दुसऱ्या बाजूला सूर्यास्त होण्याची वेळ आली होती. सूर्यास्त पाहता पाहता मी ध्यान करू लागलो. मुलेही एका ओळीत येऊन बसली. ज्योतीने "ओम" म्हणायला सुरुवात केली आणि सर्वच मुलांनी एकत्रितपणे तिला साथ दिली. नदीच्या एका बाजूला सूर्य अस्ताला जात होता आणि दुसऱ्या बाजूला शांत, प्रसन्न वातावरणात सुंदर तालबद्ध ओंकार निनादत होता. हा एक अविस्मरणीय क्षण होता!

## स्वयं शिक्षणाचा कोपरा

मी शाळेच्या मुख्य इमारतीपासून लांब असणाऱ्या विज्ञानाच्या प्रयोगशाळेत गेलो. खरे म्हणजे ती काही प्रयोगशाळा नव्हती, पण तो एक "विज्ञानाचा कोपरा" होता. दोन लहान टेबले आणि काही उपकरणे तिथे मांडून ठेवलेली होती. मल्लिकार्जुन तिथे उष्णतेसंबंधी प्रयोग करत होता. शिक्षकांनी तयार केलेले 'वर्क कार्ड' जवळच जमिनीवर पडलेले होते, त्याकडे तो मधून मधून पहात होता... मी तिथे पाऊल ठेवताक्षणीच एक फुगा फुटला. हा प्रयोग करण्यासाठी मी त्याला जे फुगे दिले होते त्यातला हा अखेरचाच फुगा होता. मल्लिकार्जुनने भाबडेपणाने मला सांगितले, "सगळे फुगे फुटले..."

"हे बघ, तू एकट्यानेच जर मोठी मेणबत्ती संपवलीस आणि पाचही फुगे फोडलेस, तर मग इतरांनी उष्णतेबाबतचे प्रयोग कसे करायचे? आपली शाळा गरीब आहे, वर्गातल्या इतर मुलांसाठी मी हे सर्व सामान कुठून आणू? तुला दिलेली साधनं तू काळजीपूर्वक वापरायला हवीस. तुमच्यापैकी प्रत्येकाला एक मेणबत्ती आणि पाच फुगे आणून देणं माझ्यासाठी खरंच फार कठीण आहे..." मी त्याला समज दिली आणि त्याच्या प्रयोगाच्या निष्कर्षांविषयी चौकशी केली. मग प्रयोग नलिका कशी वापरायची हे त्याला समजावून सांगितले. त्यानंतर मी चिकूच्या झाडाकडे गेलो.

विज्ञान कोपऱ्यात हवा, पाणी, प्राणवायू, कर्बद्विप्राणील वायू वगैरे तयार करण्यासाठी आवश्यक ती साधनसामग्री आणि रसायने ठेवलेली होती. त्यासाठीच्या सूचना 'वर्क कार्ड' मध्ये दिल्या होत्या. मुले हे प्रयोग शिक्षकांच्या मदतीशिवाय करत आणि त्यांचे निष्कर्ष लिहून ठेवत. फुटलेल्या प्रयोगनलिका आणि इतर साहित्य परत आणणे आमच्यासाठी सोपे नव्हते. पण मुले ज्या उत्साहाने आपले शोध आणि निष्कर्ष सांगायला शिक्षकांकडे येत, त्या आनंदापुढे ही किंमत काहीच नव्हती! सगळेच लहानगे आर्किमिडीस होते! एकट्या मल्लिकार्जुनमध्ये भविष्यात शास्त्रज्ञ बनू शकण्याची गुणवत्ता होती. मी आराम करत असताना मला अनेक प्रश्न विचारून तो आपली उत्सुकता शमवत असे. इतरांमध्ये इतकी जिज्ञासा क्वचितच दिसे.

चिकूच्या झाडाखाली 'मातीकामाचा कोपरा' होता. रवी आणि जया कुंभाराच्या मोठ्या चाकासमोर बसून मातीचे भांडे बनवत होते. वास्तविक त्यांना एक लहान भांडे बनवायचे होते पण ते झाले होते एक मोठे पसरट भांडे! चाकाला गती दिल्यावर त्यांनी सुरुवात केली पण चाकावरून माती खाली घरंगळत होती! जया चिडली होती.

"हे काही जमत नाही..." निराश होऊन तिने माती चाकावर फेकून दिली. मग मी सूत्रे हाती घेतली, चाकासमोर बसलो आणि माती चाकावर ठेवली. रवीने चाकाला गती दिली. अंगठ्याचा वापर करून मी एक लहान पेला बनवला...

"बघा, आपल्यात चिकाटी असायला हवी. आपण जे काही करत असू, त्यावर पूर्ण लक्ष केंद्रित करायला हवं..." असं तिला सांगून मी शाळेच्या मुख्य इमारतीकडे गेलो. एकट्या जयानेच हे कौशल्य आत्मसात केले.

शांता आणि हेमलता शाळेच्या इमारतीबाहेर व्हरांड्यात बसून चित्र रंगवत होत्या. हा होता 'चित्रकलेचा कोपरा'. हेमलताने रंगीबेरंगी चित्रांचा सुंदर परकर नेसलेल्या एका मुलीचे चित्र काढले होते. तिला मुलींच्या चित्राखेरीज इतर चित्रे काढण्यात रस नाही. उलट, शांताने एका मोठ्या कागदावर मुलीचे एक लहानसे चित्र काढून त्याला अगदीच न शोभणारे कसले तरी रंग दिले होते आपले चित्र काढून झाले आहे असे समजून ती आजूबाजूला बघत बसली, तिला चित्रकलेत मुळीच स्वारस्य नव्हते. मी शांताचा कागद घेतला आणि तिने काढलेले मुलीचे चित्र समप्रमाणात मोठे केले आणि मोठ्या कागदावर मोठे चित्र कसे काढायचे आणि ब्रशचा वापर कसा करायचा ते तिला दाखवले.

विजया, हेमलता, पेद्दा नागराजू यांच्यातील कलाकार प्रकट झाले. वर्गाच्या वेळापत्रकाकडे दुर्लक्ष करून ते चित्रे रंगवण्यात रमू लागले. नागराजूने अनेक अमूर्त चित्रे काढली. हेमलता नेहमी लहान मुलींची चित्रे काढते आणि त्यांच्या परकरावर सुंदर वेलांची आणि फुलांची नक्षी असते. विजयाच्या चिकाटीमुळे ती एक चांगली लेखिका आणि कलाकार बनली. ती कितीही वेळ आपल्या कामात कशी आनंदाने रंगून जाते हे पहायला मला नेहमीच आवडते.

मी शाळेच्या इमारतीत परत आलो. एका कोपऱ्यात आम्ही लहानसे वाचनालय केले आहे. तो आहे 'वाचनाचा कोपरा'. मार्क ट्वेनच्या एका पुस्तकाचा अनुवाद विजया शांतपणे वाचत बसली होती. जंगली 'चंदामामा' मोठ्याने वाचत होता. त्याच्या मोठ्याने वाचण्याचा विजयाला त्रास होत होता.  तिने त्याला मनात वाचायला सांगितले, पण त्याने ऐकले नाही.

या 'वाचन कट्ट्यावर' आम्ही गोष्टींची पुस्तके आणि मुलांची मासिके ठेवतो. त्यांना हवे ते त्यांनी वाचावे.  वाचून झाल्यावर आम्ही त्यांना त्यातून शिकलेल्या विषयांवर प्रश्न विचारतो. रवी, सुधीर, विजया, चिन्न नागराजू, ज्योती, कविता वगैरे खरं तर आता पुस्तकातले किडेच बनले आहेत! विजयामध्ये भविष्यातील लेखिकेची चिन्हे दिसू लागली आहेत. तिने एखादी गोष्ट, निबंध किंवा तिची स्वत:ची रोजनिशी जरी लिहिली, तरी ती तपशीलवार वर्णन करून लिहिते. स्वत:चे विचार व्यक्त करताना ती व्यवस्थितपणे, चिकाटीने आणि विचारपूर्वक लिहिते. मल्लीची कल्पनाशक्ती फार सुरेख आहे. रवी आणि नागराजू कमी लिहितात पण त्यातून त्यांचे तत्त्वज्ञानाकडे झुकणारे विचार दिसून येतात.



दुसऱ्या एका कोपऱ्यात सुधीर आणि मस्तान जमिनीवर पालथे पडून शब्दकोशातून कठीण शब्दांचे अर्थ शोधत होते. मुले दिलेल्या शब्दांच्या विरुद्ध अर्थी शब्द, त्याच अर्थाचे आणखी शब्द, उच्चार तसाच पण अर्थ भिन्न असलेले शब्द वगैरे कोशातून शोधून काढतात.  हा आहे 'भाषेचा कोपरा'. त्या ठिकाणी आम्ही काही शब्दकोश आणि 'वर्क कार्डे' ठेवतो. मस्तानने एका 'वर्क कार्डा'वरील एक शब्द वाचला. मग सुधीरने शब्दकोश घेऊन त्याचा अर्थ वाचून दाखवला. तो ओरडला, "मस्तान, हे बघ, या लहानशा शब्दाचे बघ किती अर्थ आहेत यात!" जवळ जवळ दीड पानाचे अर्थ आहेत!" सुधीरला खूपच आश्चर्य वाटले! सुरवातीला मुलांना हे जाडजूड शब्दकोश वापरायला आवडत नव्हते, पण हळू हळू नागराजूसारख्यांना यात स्वारस्य वाटू लागले. पण सामान्यत: हा कोपरा तसा कंटाळवाणाच होता.

शाळेच्या इमारतीच्या तिसऱ्या कोपऱ्यात नागराजू एकटाच चार तेलगू पुस्तके घेऊन उत्तरे शोधत होता. काही वेळा त्याला उत्तरे सापडत नव्हती, मग तो उतावळा होत होता. हा होता 'संदर्भ कोपरा'. इथे आम्ही एकाच विषयावरील निरनिराळ्या लेखकांची २-४ पुस्तकं आणि १-२ प्रश्न असलेली 'वर्क कार्ड' ठेवतो. मुलांनी त्यातून निरनिराळ्या लेखकांची त्याच प्रश्नावरील उत्तरे शोधायची असतात. मी नागराजूच्या शेजारी जाऊन बसलो आणि संदर्भ कसे शोधायचे हे त्याला समजावून सांगितले. त्यानंतर त्यांनी वर्गात याबाबत चर्चा करायची असते.  हे त्यांच्यासाठी कठीण आहे. मुलांच्या वयानुसार आणि इयत्तेनुसार वापरता येतील अशी पुस्तके तेलगू मध्ये उपलब्ध नसणे हे त्यामागचे खरे कारण आहे.  जी पुस्तके उपलब्ध होती ती त्यांच्या सोयीची नव्हती. यातील भाषा क्लिष्ट होती आणि कारण नसताना वापरलेले शब्दालंकार ती अधिकच गुंतागुंतीची करत होते. म्हणून मुलांना या कोपऱ्यात जाण्यातही रस नव्हता.

शाळेत ‘स्वयंअध्ययनाचे’ असे एकूण सहा कोपरे होते. प्रत्येक ठिकाणी एक ‘वर्क कार्ड’ ठेवलेले असे. त्यावर दिलेल्या सूचनांनुसार मुलांनी आपल्या आवडीनुसार, आपल्या जबाबदारीवर आणि स्वत:ची बुद्धी वापरून शिक्षकांच्या मदतीशिवाय अभ्यास करायचा. यासाठी मुलांच्या जोड्या केल्या आहेत आणि प्रत्येक जोडीला आठवड्यातून एकदा तरी प्रत्येक कोपऱ्यात अभ्यास करता येतो. प्रत्येक जोडीला दररोज शाळेचा एक तास इथे घालवता येतो.

सुरुवातीला मुलांना ही ‘स्वयं अध्ययनाची’ कल्पना समजतच नव्हती, कारण आतापर्यंत ते शिक्षकांच्या शिकवण्यावरच अवलंबून रहात होते. आता या ‘स्वयं अध्ययनाच्या’ जागी शिक्षक नव्हते, त्यांच्यावर कोणाची नजर नव्हती, शिक्षकांच्या सूचना नव्हत्या, काय करायचे याचा सल्ला घ्यायला शिक्षकही नव्हते... होती केवळ ‘वर्क कार्ड’, ती वाचायची आणि मुकाट्याने पुस्तके घेऊन त्यातून आपल्या आपणच शिकायचे. प्रत्येक जोडीने आपले काम करायचे. इतर कोणाची लुडबूड नाही, वर्गातला गोंधळ नाही, भांडण आणि चिडवाचिडवीही नाही.

हळू हळू मुलांचे स्वारस्य वाढत गेले आणि या पद्धतीने मुलांची बौद्धिक क्षमता विकसित होण्यास निश्चितच मदत झाली.

मल्लिकार्जुनला विज्ञानातील प्रयोगांमध्ये खूपच रस होता आणि त्याला रोज विज्ञानाच्या कोपऱ्यातच जाऊ द्यावे अशी त्याची मागणी असे. विजया आणि पेद्दा नागराजू यांच्यातील कलागुणांना बहर आला. रवी, विजया आणि सुधीर पुस्तकातले किडे बनले, केव्हाही मोकळा वेळ मिळाला, की ते एक पुस्तक घेऊन वाचत बसू लागले. शांता आणि हेमलताना कशातच विशेष स्वारस्य नव्हते. मस्तानला नाटकात आणि नकला करण्यात रस होता. जंगली आणि जया यांना शेतातल्या कामासारखी शारीरिक कामे करायला आवडत होती.

मुलांमधील अंगभूत क्षमता शोधण्याचा आम्ही कसोशीने प्रयत्न केला. शिक्षकांच्या देखरेखीखाली त्यांच्या आवडी आणि नावडी कधीच समोर येत नाहीत. हे ‘स्वयं अध्ययनाचे’ कोपरे सुरू केल्यानंतर काही महिन्यांतच मुलांना खरे स्वारस्य कशात आहे हे दिसून येऊ लागले. हे आश्चर्यकारक होते. परंतु निधीच्या कमतरतेमुळे त्यांच्या स्वारस्याला खत-पाणी कसे देता येईल याचीच आम्हाला काळजी वाटत असे.

# प्रदर्शन

श्रीमती शोभा स्त्रीवादी आहेत. स्त्रियांच्या हक्कांसाठी त्या काम करतात. त्या बऱ्याच वेळा स्त्रियांच्या समस्यांची, विशेषत: कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीकोनातून स्त्रियांच्या सुरक्षिततेची चर्चा करतात. महिलांच्या समस्यांविषयी पोस्टर्स तयार करून त्यांची प्रदर्शनेही भरवतात. अशा प्रकारे महिलांच्या प्रश्नांबाबत जनतेत जाणीव निर्माण करून त्याकडे लक्ष वेधण्याचा त्यांचा प्रयत्न असतो.

शाळेशी त्यांचे एक अतूट मैत्रीचे नाते आहे. अधून मधून त्या शाळेत येतात आणि अनेक विषयांवर चर्चा करतात. अनेक महिन्यांच्या परिश्रमाने त्यांनी ‘स्त्रिया व कायदा’ याविषयी अनेक पोस्टर्स तयार केली. ८ मार्च १९८८ रोजी, आंतरराष्ट्रीय महिला दिनाच्या निमित्ताने नेलोरच्या महिलांच्या वाचनालयात त्यांनी एक प्रदर्शन मांडले. शाळेतील मुलांना त्यांनी या प्रदर्शनाचे आमंत्रण दिले.




प्रदर्शनाला जाण्याच्या दोन दिवस आधीच मुलांना महिलांच्या समस्यांची जाणीव करून देण्यात आली. मुलांनी आपले अनुभव सांगितले... त्यांच्या घरात वडिलांचे कसे राज्य असते; ते त्यांच्या आयांना कसा त्रास देतात! स्त्रिया व पुरुष दिवसभरात काय काम करतात त्याची मुलांनी वर्गवारी केली. प्रत्येक कामाला किती वेळ लागतो, कोणती कामे कठीण आहेत, स्त्रिया व पुरुष कोणकोणती कठीण कामे करतात, पुरुष महिलांवर कसे वर्चस्व गाजवतात, पुरुष घरकामात मदत का करत नाहीत, ते महिलांशी कसे वागतात, सासूबाई आपल्या सुनांशी कशा वागतात, शाळेत शिकणारे मुलगे मुलींशी कसे वागतात वगैरे...

इतकेच नाही, तर महिलांशी संबधित अशा अनेक बाबींची मुलांनी चर्चा केली. त्यांना खरेच वाईट वाटले.

याच कालावधीत गावातील तीन व्यक्तींनी आत्महत्येचा प्रयत्न केला. एकाची बायको कोणाबरोबर तरी पळून गेली म्हणून, नवऱ्याने केलेले अत्याचार सहन न झाल्याने एका महिलेने आत्महत्येचा प्रयत्न केला, आणि तिसरा होता एक वृद्ध माणूस... आयुष्यातील दु:ख पचवता न आल्याने, असमाधानातून तिघांनीही आत्महत्येचा प्रयत्न केला होता. गावात दर तीन-चार महिन्यांनी कोणीतरी आत्महत्या करते. मुलांनी यामागील सत्य जाणून घेऊन त्याच्या कारणांचे शाळेत असेंब्लीच्या वेळी विश्लेषण केले.

मुले पहात असतात, ऐकत असतात. परंतु, त्यांच्या विचारचक्रावर कशाचाच परिणाम होत नाही. म्हणून मुलांचा नेहमी ज्या विषयांशी संबंध येतो त्यांचे विश्लेषण करून त्यांची मते मोकळेपणाने मांडण्यासाठी शाळा महत्त्वाची भूमिका बजावू शकते. जरूर असल्यास, त्यांनी स्वत: माहिती जमवावी आणि समस्येच्या मुळाशी जाऊन त्यामागील कारणे समजून घ्यावीत. या महत्त्वाच्या विषयाकडे शिक्षकांनी लक्ष देणे अगत्याचे ठरेल.

प्राथमिक शाळेतील मुलांना महिलांच्या समस्यांसारखे जटील विषय कसे काय समजतील असे तुम्हाला वाटेल. आणि त्यांच्या वयाचा विचार करता ते त्यांच्या आकलनापलीकडचे आहेत असेही तुम्हाला वाटू शकेल. म्हणून त्यांचा अभ्यासक्रमात समावेश करू नये असे तुमचे मत होईल. पण माझा असा प्रश्न आहे की पाठ्यपुस्तकांच्या किती लेखकांना मुलांचे मानसशास्त्र आणि त्यांच्या मानसिक क्षमतेचे ज्ञान आहे? मुलांच्या कल्पनाशक्तीची आणि त्यांच्या स्वप्नांची किती लेखकांना माहिती आहे?

पाठ्यपुस्तक उघडले, तर त्यात अवास्तव नीतिशास्त्राचे धडे ठासून भरलेले दिसतील. पण त्यातून मुलांना आजूबाजूच्या आयुष्याचे निरीक्षण करण्याची, शोध घेण्याची, संशोधन करण्याची, विश्लेषण करण्याची आणि आपले अनुभव इतरांना सांगण्याची संधी मिळणार नाही. त्यांना स्त्रियांची, निसर्गाची, समाजाची, देशाची, जगाची आणि अखेर त्यांच्या स्वत:ची देखील काळजी घेण्याची संधी मिळणार नाही. त्यांना निरुपयोगी नीतितत्त्वे शिकवली जातील, पाठांतर करून परीक्षेत पास व्हावे लागेल आणि प्रत्यक्षात विचार कसा करावा, कसे वागावे, जबाबदारी कशी घ्यावी हे मात्र शिकवले जाणार नाही आणि आयुष्यावर प्रेम कसे करावे हे तर मुळीच शिकवले जाणार नाही. पण पळपुटेपणा मात्र नक्कीच शिकवला जाईल!!

मुलांच्या आजूबाजूचा परिसर, वातावरण आणि सामाजिक व आर्थिक परिस्थिती (गरिबी, अज्ञान, पालकांचा आणि समाजातील नेत्यांच्या स्वार्थीपणामुळे आलेला निष्काळजीपणा...) या सर्व गोष्टी फार नाजूक, संवेदनशील आणि मुलांसाठी फार महत्त्वाच्या ठरतात. म्हणूनच सरकारी पाठ्यपुस्तके मुलांच्या पचनी पडत नाहीत. त्यांच्या आयुष्याचे विश्लेषण करता येण्यासाठी मदत होईल अशा शिक्षणाची त्यांना गरज आहे.

दुसऱ्या दिवशी दुपारी मुलांनी करुणाजनक चित्रे रंगवली: सुनेच्या अंगावर रॉकेल ओतणारी सासू; नवरीच्या वडिलांकडून कडून हुंडा घेणारा नवरदेव; अनैतिक संबंध ठेवणारा नवरा; बायकोला छळणारा नवरा; बालविवाहाचे दृश्य वगैरे.

मुलांच्या आई-वडिलांनीही या समस्यांना तोंड दिले होते. मुलांना आपल्या आई-वडिलांच्या समस्या आणि त्यातून येणारे दु;ख माहित आहे. स्त्रियांच्या समस्यांची त्यांना तोंडओळख करून देण्यात आली. त्यानंतर ते 'स्त्रिया व कायदा' हे प्रदर्शन पहायला गेले.

शोभा आणि त्यांच्या चमूने मुलांचे स्वागत केले आणि प्रत्येक पोस्टरचा अर्थ मुलांना सोप्या शब्दांत समजावून सांगितला. आता मुलांच्या मनात अनेक प्रश्न निर्माण झाले. त्यांनी आपली मते नि:संकोचपणे, मोकळेपणाने मांडली. ही प्राथमिक वर्गातली मुले आहेत आणि त्यांच्या वयाच्या मानाने मोठे असणारे विषय त्यांनी या प्रदर्शनातून समजून घेतले. अनेक पदवीधरांना देखील आयुष्याच्या वास्तवाचे ज्ञान नसते.

त्या दिवशी, प्रत्येकाच्या, विशेषत: मुलींच्या, डोळ्यांत अश्रू होते. त्यांच्या काळजात दु;ख होते. अर्थात, मस्तान आणि सुधीर सारख्या मुलांना प्रदर्शन आवडले नाही. कारण त्यांना या विषयात स्वारस्य नव्हते... न्यायालये, पोलीस, कायदे यासारखे विषय मुलांच्या आवडीचे नव्हते. परंतु स्त्रिया आणि पुरुष यांच्याविषयी भेदाभेद करू नये हे त्यांना समजले.

ही पोस्टर्स पाहिल्यानंतर त्यांनी शोभाशी संवाद साधला.

पोस्टर्सच्या माध्यमातून जयाने शोभाच्या वैयक्तिक आयुष्यात प्रवेश केला, "ताई, तुमचे लग्न झाले आहे, मग तुम्ही 'मंगळसूत्र' का घालत नाही? तुम्ही कानात काही का घालत नाही? कपाळावर कुंकू का नाही लावत?"

# कामाच्या माध्यमातून शिक्षण

मी मुलांना का शिकवतो? कारण मी जर त्यांच्यातील सुप्त कौशल्ये चालना देऊन विकसित केली तर ते खऱ्या अर्थाने माणूस बनतील, चांगुलपणाचा प्रसार करतील आणि जग कसे आहे हे स्पष्टपणे समजून घेऊन त्यानुसार वागतील.

माणूस आणि समाज यांना सुखी करण्याच्या प्रयत्नात माणूस आणि समाज यांची निसर्गापासून फारकत करण्यात आली आहे. वस्तूंच्या खरेदी-विक्रीच्या माध्यमातूनच सुरक्षितता आणि सुख लाभेल या चुकीच्या संकल्पनेतून स्पर्धेचा पाया घातला गेला. पण यातून द्वेष आणि हिंसाचारालाच प्रोत्साहन मिळाले. या भौतिकवादी दृष्टिकोनामुळे आपण शांती, सुख आणि आनंदी आयुष्याला मुकलो आहोत. हे तहान भागवण्यासाठी समुद्रावर जाण्यासारखे आहे. निसर्गापासून दूर जाण्याने आणि त्याचा ऱ्हास करण्याने अखेर आपण आपल्याच विनाशाकडे जात आहोत. आपल्या आयुष्यातील आणि बाह्य जगतातील या विनाशाची जाणीव झाल्यानंतरच आपण खऱ्या अर्थाने 'पूर्ण आयुष्याचा' मार्ग चोखाळू शकू.

एक गोष्ट आहे. एकदा एक मुलगा शिल्पकला शिकण्यासाठी एका शिल्पकाराकडे गेला. गुरुंनी प्रथम त्याला चित्रकला शिकायला सांगितली, म्हणजे त्याला शरीराचा समतोल समजेल. मुलगा चित्रकला शिक्षकांकडे गेला. त्या गुरुंनी सुचवलं की त्याने प्रथम नृत्य शिकावे म्हणजे त्याला शरीराच्या हालचाली समजतील. मुलगा नृत्यशिक्षकांना भेटला तेव्हा त्यांनी त्याला प्रथम संगीत शिकायला सांगितलं, म्हणजे त्याला ताल समजेल. मुलगा संगीत शिक्षकांकडे गेल्यावर त्यांनी त्याला साहित्याचा अभ्यास करायला सांगितला, त्याने त्याला आपल्या भाव-भावनांचे आकलन होईल. साहित्याच्या शिक्षकांनी लोकांच्या भाषेचे निरीक्षण करण्याचा सल्ला दिला, त्यायोगे निरनिराळ्या संदर्भात शब्दांचा कसा वापर होतो ते त्याला समजून घेता येईल. मुलाने आजूबाजूच्या लोकांचे निरीक्षण सुरू केल्यावर त्याला आयुष्यातील संघर्षाची, सुखाची आणि दु:खाची जाणीव झाली!

या गोष्टीतून आपल्याला दोन गोष्टी समजतात: एक, प्रत्येक विषय इतर विषयांशी निगडीत असतो, आणि दुसरे, 'प्रत्यक्ष जीवन' हाच काहीही शिकण्याचा एकमेव मार्ग आहे!

आपण जर सध्याच्या शिक्षण पद्धतीकडे पाहिले, तर ती तुकड्या-तुकड्यात विभागलेली आहे असे आपल्या निश्चितच लक्षात येईल. एकमेकांशी संबंध नसलेल्या निरनिराळ्या विषयांमध्ये प्राविण्य मिळवण्यासाठीच्या स्पर्धेतून मानवी मूल्यांची हानी होत नाही का? त्यातून मनाच्या एकात्मिक विकासात अडथळा येत नाही का? मग त्यातून जगात चांगुलपणाचा प्रसार होईल अशी अपेक्षा मला कशी करता येईल?

पर्यायी शाळा ही समस्या सोडवण्याचा आटोकाट प्रयत्न करत आहेत. या शाळा जरी माध्यमिक शिक्षणाच्या पातळीपर्यंत शिकवत असल्या, तरी अभ्यासाचे विषय आणि कला-कौशल्ये यांच्यातील संबध मुलांना समजावा अशा तऱ्हेने त्यांची सांगड घातली जाते. उदाहरणार्थ, एखादा धडा शिकवताना मुलांना चित्रे काढायला, मातीच्या वस्तू/मूर्ती बनवायला किंवा 'कोलाज' बनवायला अथवा वेगवेगळ्या पात्रांशी संवाद साधून नाटुकले करायला सांगता येते. शिक्षणाच्या अशा एकात्मिक प्रक्रियेतून मुलांच्या निर्मितिक्षमतेला चालना मिळते.

तरीही काही प्रश्नांचा मला अधिक विचार करावा लागतो. अभ्यासाच्या विषयांची कला-कौशल्याशी सांगड घालण्याने आपण या कलांपैकी एखाद्या कलेत तरी -चित्रकला, संगीत, मातीकाम, सुतारकाम- अशामध्ये 'उत्कृष्ट व्यवसायिक कौशल्य' विकसित करण्यासाठी प्रोत्साहन देत आहोत का? कला व अभ्यासक्रम यांची सांगड घालण्याने मुलांना शिक्षणक्रमातील संकल्पना स्पष्टपणे समजण्यास मदत होईल. परंतु, एखादे कौशल्य आत्मसात करण्यास यात कमी महत्त्व दिले जाते.

सर्वप्रथम, मला मुलांना शिकवायला आवडते. आणि ज्या मुलांना 'योग्य शिक्षण' परवडत नाही, अशा गरीब मुलांसाठी काम करायचे मी ठरवले आहे.

पण मुलांना केवळ शिकवून त्यांना परीक्षाकेंद्रित शिक्षणप्रवाहात आणणे हे माझ्यासाठी पुरेसे आहे का? सध्याच्या शिक्षण व्यवस्थेतून गरीब मुलांना सामाजिक व आर्थिक परिस्थितीतून बाहेर काढण्याचा पर्यायी मार्ग शोधला जात आहे का?

अजूनही, अस्पृश्यता, निरनिराळ्या जाती आणि समाजातील संघर्ष चालूच आहेत. ग्रामीण मुलींचे अजूनही पौगंडावस्थेत (१२ ते १४ वर्षे) विवाह होत आहेत आणि त्यांच्यावर कौटुंबिक जबाबदाऱ्या पडत आहेत. जंगली, मल्लिकार्जुन, विजया, जया, आणि श्रीलक्ष्मी हे सर्व आमचे विद्यार्थी होते. त्यांच्या आर्थिक परिस्थितीमुळे जंगली उदरनिर्वाहासाठी एका सुतारकामाच्या दुकानात काम करू लागला. सुरेख आणि सोपे इंग्रजी लिहिणारी, आणि चार वर्षे आमच्याकडे शिकणारी आणखी एक हुशार विद्यार्थिनी श्रीलक्ष्मी आर्थिक परिस्थितीमुळे गुरे चरायला नेऊ लागली. मल्लिकार्जुन पहिल्या वर्गात १० वी पास झाला आणि डॉक्टर होण्याचे त्याचे स्वप्न होते, पण आता तो त्याच्या वडिलांना गावातल्या चहाच्या दुकानात मदत करतो. विजया १० वी पास झाली पण तिला उच्च शिक्षणाची संधी मिळाली नाही, तिचा विवाह झाला आणि तिला आता एक बाळही झाले आहे. एका मध्यमवर्गीय व्यावसायिकाची मुलगी हेमलताच फक्त कनिष्ठ महाविद्यालयात गेली आहे. मग, आपण या गरीब ग्रामीण मुलांच्या वागणुकीबद्दल, त्यांच्या ग्राम्य भाषेबद्दल बोलतो. तो सर्व ते ज्या समाजात राहतात त्याचाच परिणाम नाही का?

## शिक्षणाचा उद्देश काय?

सामाजिक-आर्थिक परिस्थितीतही मुलांनी उच्च शिक्षण चालू ठेवावे आणि त्यामुळे शालेय शिक्षणानंतर त्यांनी आपल्या पायावर उभे रहावे यासाठी माझ्याकडे काही पर्यायी उत्तर आहे का?

समाजातील विषमतेविरुद्ध लढा देणे ही काही इतकी सोपी गोष्ट नाही. परंतु या गरीब मुलांना त्यांच्या आर्थिक परिस्थितीतून बाहेर काढण्यासाठी काही तरी पर्यायी मार्ग शोधायलाच हवा. त्यांच्या गरीब आर्थिक परिस्थितीतून बाहेर काढण्यासाठी उपाय शोधण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला आणि त्यांचे उच्च शिक्षण चालू राहील आणि ते सुशिक्षित नागरिक बनून स्वतंत्रपणे आणि आनंदाने आपले आयुष्य जगू शकतील अशी अपेक्षा ठेवली.

शिक्षण आणि 'उपयुक्त काम' यांची एकात्मिक शिक्षण या दृष्टीने सांगड घालण्याचा मी प्रयत्न केला. यात सामान्य शिक्षणाबरोबरच मुलांना व्यावसायिक कौशल्येही आत्मसात करण्याची संधी मिळाली. त्यांच्या या श्रमांचे त्यांना मानधन मिळावे अशी माझी इच्छा आहे, त्यातून त्यांचे शिक्षणही चालू रहावे आणि शाळाही आत्मनिर्भर बनावी. परंतु प्रत्यक्षात मुलांना मानधन मिळवून देण्यात मला अपयश आले.

आपल्या शाळकरी मुलांची केवळ सामाजिक-आर्थिक परिस्थितीच नव्हे, तर ए.एस. माकारेन्को यांचे 'समाजात राहून शिक्षण' याबाबतचे प्रयोग आणि गांधीजींच्या 'मूलभूत शिक्षण' याविषयीच्या संकल्पना यामुळे मला याविषयी प्रेरणा मिळाली. हे निव्वळ सिद्धांत नाहीत, तर सामाजिक-आर्थिक परिस्थिती हाताळण्याबरोबरच यामागे आध्यात्मिक विचारही आहे.

मी शेतीशी निगडीत प्रत्यक्ष कामाचा आणि शिक्षणाचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला. यातून विद्यार्थ्यांच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा विकास होऊ शकेल अशी माझी भावना होती. 'यतकलच्या शिक्षण केंद्रा'त आमची मोठी परसबाग होती आणि आम्ही अर्ध्या एकर जागेत भुईमुगाचे पीक घेतले होते. या कामाशी संबंधित असा काही थोडाच अभ्यास आम्हाला घेता आला, पण भाज्या आणि भुईमुगाच्या उत्पादनामुळे आम्हाला बरेच पैसे वाचवता आले. शिक्षक, प्रशिक्षणार्थी आणि विद्यार्थी या सर्वांचाच यात सहभाग होता. सृजन शाळेत मात्र शेतीचे उत्पादन विकून आम्हाला नफा मिळवता आला नाही, परंतु शेती केंद्रस्थानी ठेवून आम्हाला संपूर्ण अभ्यासक्रम तयार करता आला.

शेतकामामुळे मुलांना निसर्गाच्या सान्निध्यात राहण्याची संधी मिळाली. निसर्गाच्या सान्निध्यात असताना मुलांमधील निरीक्षणशक्ती, कुतूहल आणि प्रयोग करण्याची वृत्ती आपोआप विकसित होते. त्यांना मिळालेल्या स्वातंत्र्याचा त्यांनी पुरेपूर आनंद घेतला. पुढील काही भागात मुलांनी प्रत्यक्ष काम करत असताना लिहिण्याचे आणि वाचण्याचे कौशल्य कसे आत्मसात केले आणि त्यांच्यातील निर्मितिक्षमतेचा कसा विकास झाला हे आपण पाहणार आहोत.

हजारो वर्षांपासून भारतीय तत्त्वज्ञान हे पूर्णपणे कर्मावर आधारित आहे. अंतिम सत्याचा शोध घेण्यासाठी फारच थोडे लोक संसारत्याग करून ध्यानधारणा करण्यासाठी गुहेत जाऊन राहतात. परंतु गृहस्थाश्रमात लोकांना काम करावेच लागते. काम करत असतानाच अंतर्मुख होऊन आपल्या भाव-भावना, वृत्ती, नातेसंबंध, विचार, कामातील कौशल्य, निर्मितिक्षमता यांच्याकडे लक्ष देतानाच सत्याचा शोध घ्यायचा असतो. आपला जर देवावर किंवा बौद्ध धर्माच्या संदर्भात 'धर्मावर' विश्वास असेल, तर आपल्याला कोणतेही काम मनापासून, लक्षपूर्वक आणि आनंदाने करायचे असते आणि त्याचा परिणाम देवावर किंवा 'धर्मावर' सोडून द्यायचा असतो. जरी त्याचे शोषण झाले तरी देवावर/ धर्मावर त्याचा विश्वास असल्याने, प्रत्येक मनुष्यप्राण्यात त्याला देव दिसत असल्याने तो त्यांची सेवा करत राहतो. ही कामाच्या माध्यमातून एक प्रकारची ध्यानधारणाच आहे. भारतात काम करत असताना स्वत:चे निरीक्षण करण्याच्या ध्यानाच्या अनेक पद्धती आहेत.

मी जेव्हा मुलांना ‘उत्पादक कामात’ सहभागी करून घेण्याबाबत बोलतो, तेव्हा त्यांच्या सामाजिक-आर्थिक परिस्थितीतून त्यांना बाहेर काढण्याचा एकच उद्देश नसतो, तर त्यांनी निसर्गाशी एकरूप होऊन जगणे शिकावे असा एक आध्यात्मिक उद्देशही असतो.

# निसर्गाच्या सान्निध्यातील शिक्षण

शिक्षकाने या सर्व गोष्टींबद्दल बोलावे, पण केवळ शब्दांतून नव्हे, तर माणसांचे आणि निसर्गाचेही जग त्याला प्रतीत व्हायला हवे... त्यांचा एकमेकांशी संबंध असतो. निसर्गाचा ऱ्हास केला तर माणूस त्याच्या परिणामापासून सुटू शकत नाही, त्यात त्याचाही ऱ्हास होतो. शत्रू हा कोणी दुसरा नसून तो स्वत:च असतो. निसर्गाशी आणि जगाशी एकोप्याने राहिल्याने एक नवेच जग निर्माण होते.

**जे. कृष्णमूर्ती,**

**शाळांना पत्रे -२**



**शेतीवर आधारित शिक्षण** हा एक महान अनुभव होता. जणू काही गाण्यातून आणि नाचण्यातून आम्ही बऱ्याच गोष्टी शिकलो. मुलांना शिस्त कोण लावेल, शिकण्याकडे त्यांनी कसे लक्ष द्यायला हवे, आणि घरच्या भावा-बहिणींना ते कशी काय मदत करतील अशा प्रश्नांची मला काळजी वाटत होती.

बंधने, वागणुकीचे नियम, शिस्तीचे नियम... या कशाचीच मुलांच्या अभ्यासाला आणि शिकण्याला गरज पडली नाही. त्यानंतरच त्यांना शिस्त लागू शकली.

**शेतीवर आधारित शिक्षणाचा प्रयोग** हा मुख्यत: मुलांना आपण निसर्गाचा एका भाग आहोत असे वाटावे आणि त्यांची निसर्गाशी जवळीक व्हावी या दृष्टीने सुरू करण्यात आला होता. आम्ही त्यात आणखी दोन उद्दिष्टे ठेवली. एक, शारीरिक श्रमाविषयी प्रेम व आदर निर्माण व्हावा, आणि दोन, शाळा आत्मनिर्भर बनावी. ही उद्दिष्टे साध्य झाली असोत वा नसोत, निसर्गाच्या सान्निध्यात शिकणे महत्त्वाचे होते. **शेतीवर आधारित शिक्षण** पावसाळ्यानंतर तीन महिन्यापर्यंत चालू राहिले. मुलांनी शाळेचे दोन तास प्रत्यक्ष प्रयोगातून ज्ञान मिळवण्यासाठी शेतात काम केले. आदल्या दिवशी काय केले याची चर्चा दुसऱ्या दिवशी वर्गात करण्यात येत असे. यात नांगरणे, बी पेरणे, पाण्याचे हौद बांधणे, खतांचा वापर, तण काढणे, कापणी वगैरेचा समावेश होता... शेतीच्या कामातून त्यांना तेलगु, विज्ञान, गणित तसेच चित्रकला, संगीत आणि नाट्य वगैरे शिकण्यासही मदत झाली. त्यांच्यातील निर्मितीक्षमतेला यातून पुरेपूर वाव मिळाला.

मुलांनी उत्पादक कामात, आवश्यक ती कौशल्ये शिकण्यात, विक्री करण्यात आणि शाळेला स्वयंपूर्ण बनवण्यात भाग घेतला. शिक्षणाच्या या प्रयोगातून मुलांना खऱ्या जगाची ओळख होण्यास आणि इतरांबरोबर समन्वयाने काम करणे शिकण्यास मदत झाली. यातून व्यक्ती, समाज आणि निसर्ग यातील नाते लक्षात येते.

या प्रयोगाच्या तीन पायऱ्या होत्या. प्रत्येक स्तरावर विद्यार्थी निरीक्षण व प्रयोग करून अभ्यास करतात आणि त्यावर चर्चाही करतात.

शाळेच्या शेतात एका एकरात मका (एकदल धान्य), अर्ध्या एकरात भेंडी आणि अर्ध्या एकरात काकडीचे वेल लावण्यात आले होते. तण काढणे, कापणी यासारख्या शेतातील कामाविषयी मुलांनी तेलगु व इंग्रजीच्या वर्गात गाणी लिहिली. शेतकऱ्यांच्या मुलाखती घेऊन त्यावरून गोष्टी लिहिल्या. शेतीच्या कामाविषयीचा एक कोशही त्यांनी तयार केला.

विज्ञानाच्या वर्गामध्ये जमीन, माती, शेतीची अवजारे, खते, रासायनिक खते वगैरे विषयांवर त्यांनी निबंध लिहिले. गणिताच्या तासाला आलेख, आकडेवारी, टक्केवारी, प्रमाण, नफा व तोटा वगैरेंचा अभ्यास केला. कलाकौशल्याच्या वर्गात मुलांनी मोठाली चित्रे काढली. मातीची खेळणी तयार केली, वाळवलेल्या झाडांचा एक संग्रह देखील तयार केला. अशा प्रकारे निसर्गच आमचे पाठ्यपुस्तक बनला. एखादे मेलेले घुबड किंवा मेलेल्या खारीची अंतर्गत इंद्रिये मुलांना दाखवली तेव्हा त्यांच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाही. त्याचप्रमाणे शेतातील निरनिराळ्या प्रकारची झाडे, पशु-पक्षी, किडे वगैरेंचीही त्यांनी माहिती करून घेतली.

मानवी नाती, माणूस व निसर्ग यांच्यातील नाते निरनिराळ्या प्राण्यांची जीवनचक्रे अशा अनेक गोष्टींबाबत आम्ही मुलांशी गप्पा मारत असू. प्रदूषण, निसर्गाचा ऱ्हास यांचीही आम्ही सविस्तर चर्चा केली. निसर्गाचा नाश म्हणजे आपल्याला मारून टाकण्यासारखेच आहे... पुरेशा काळाने आणि प्रयोगांतून मुलांना हे सत्य चांगले समजले.

परंतु झाडांना दगड मारणे हे नेहमीच होत असे. शेतात गेल्यावर उसाची चोरी होतच होती. असे असूनही आपण पाठ्यपुस्तकातून न शिकता निसर्गाकडूनच शिकत आहोत हे मुलांना चांगले समजले होते. मल्लिकार्जुन सारख्या मुलांना त्यांच्या निबंधांचा वर्गात अभ्यास केला जातो हे पाहून आश्चर्याचा धक्काच बसत होता.

बरेच परिश्रम, योग्य व चांगला विचार, अनुभव या सर्वांना सारखेच महत्त्व देणे आणि मुलांना नवा विचार व वृत्ती देणे हा शेतीवर आधारित शिक्षणाच्या प्रयोगाचा एकमेव उद्देश होता.

# शेतीनिष्ठ शिक्षणाचा प्रयोग

'पर्माकल्चर' या शब्दाचा अर्थ आहे 'कायम टिकणारी' किंवा 'शाश्वत शेती'. यात वेगवेगळी पिके घेण्यास प्रोत्साहन दिले जाते. योजनाबद्ध सेंद्रिय शेती म्हणजे 'शाश्वत शेती'. योजनाबद्ध शाश्वत शेतीच्या पद्धतीत अनावश्यक श्रम कमी होतात. अशी शेती करणारा शेतकरी सूर्यप्रकाश, वारा आणि पावसाचे पाणी अशा नैसर्गिक ऊर्जास्रोतांचा परिणामकारक पद्धतीने उपयोग करू शकतो. या पद्धतीने झाडे, पिके, भाज्या, शेतावरील पशु-पक्षी, प्राणी यांच्यासोबत एकोप्याचे नाते निर्माण करू शकतो ज्यायोगे सर्वांनाच आपल्या अस्तित्वासाठी एकमेकांची मदत होऊ शकते. ही पद्धत कोणत्याही परिस्थितीत आणि स्थानिक वातावरणात वापरता येते. त्यातून शेतकऱ्याचे कुटुंब स्वयंपूर्ण होऊन इतरांनाही आत्मनिर्भर बनण्यास मदत करू शकते.

सेंद्रिय शेतीच्या प्रकल्पात गिरीपुष्प (ग्लायरीसिडिया) सारखी नत्रवायू (नायट्रोजन) चे जमिनीतील प्रमाण वाढवणारी झाडे शेताच्या बांधावर लावता येतात. ही झाडे केवळ जमिनीतील नत्रवायू धरून ठेवतात इतकेच नव्हे, तर जमिनीलाही त्यांच्या पानांचे अच्छादन मिळते. अशा बांधामुळे व झाडांमुळे जमिनीची धूप रोखता येते आणि जमिनीतील आर्द्रता देखील टिकवता येते. शेतजमिनीत निरनिराळी पिके घेण्याची पद्धत राबवता येते. नेहमी तेच एक पीक घेण्याऐवजी कोणत्याही प्रकारच्या जमिनीत निरनिराळी पिके घेण्यास प्रोत्साहन दिले जाते. मसूर, नाचणी आणि ज्वारी ही पिके एकाच वेळी एकत्रितपणे घेता येतात. प्रथम वेलावरील उत्पादनाची कापणी होते. सामान्यत: वेलावरील पिके ४५ ते ६० दिवसात तयार होतात. त्यानंतर ज्वारी किंवा भुईमूग यासारखे मुख्य पीक काढले जाते. सर्वात शेवटी मसूर काढले जातात. या पिकाला जास्त दिवस लागतात आणि त्याची उंचीही मुख्य पिकापेक्षा जास्त असते. या तीन प्रकारच्या पिकांमुळे कुटुंबाच्या गरजा भागतात आणि मजुरांना कामही मिळते. निरनिराळी पिके एकत्रितपणे घेण्यामुळे किडीची समस्या कमी होते आणि जमिनीची सुपिकताही वाढते. या पिकांमध्ये झेंडू आणि औषधी वनस्पती देखील लावता येतात. त्यांच्यामुळे कीड आणि तणही कमी होतात. शेतात ज्या बाजूने वारा येत असेल, त्या बाजूच्या बांधावर मोठी झाडे लावतात. मोठ्या झाडांच्या समोर दुसऱ्या रांगेत लहान झाडे लावतात. तिसऱ्या ओळीत झुडुपे लावतात. म्हणजे या झाडांमुळे जून व जुलै महिन्यातल्या जोरदार वाऱ्याला प्रतिबंध होतो आणि वाऱ्याने होणारे पिकाचे नुकसानही टाळता येते. सामान्यत: पेरूसारखी फळझाडे बांधावर लावतात. म्हणजे शेतकऱ्यांना आणि त्यांच्या मुलांना वर्षभर निरनिराळी फळेही मिळतात. ज्या ठिकाणी जमिनीला उतार असेल, तेथे एका लहानसे तळे किंवा पाणी अडवण्यासाठी एका बंधारा बांधतात म्हणजे जमिनीतील पाण्याची पातळी वाढते आणि जनावरांच्या पाण्याचीही सोय होते.

सेंद्रिय शेतीच्या पद्धतीची ही एक साधी अशी रूपरेषा आहे. या विविध-अंगी आणि एकात्मिक शेतीच्या योजनेमुळे जमीन आणि पर्यावरण यांच्याकडे अधिक लक्ष देऊन त्याची जबाबदार पद्धतीने काळजी घेतली जाईल. त्यातून मनुष्य आणि निसर्ग यांच्यात एक परस्परपूरक नाते निर्माण होईल. संपूर्ण आयुष्यालाच याने एक नैसर्गिक आयाम मिळून त्याचा विकास होईल.

'पाच्चा साले' आणि 'चिट्टी बाडी'त मुलांनी त्या वर्षीच्या त्याच हंगामात शेतावर काम केले. त्यांच्या कामाच्या अनुभवावरून निसर्ग आणि शेती यांच्यातील संबंध जाणून घेण्याचा त्यांनी कसोशीने प्रयत्न केला. या जाणीवेच्या आधारे आधुनिक पद्धतीच्या शेतीच्या चांगल्या व वाईट परिणामांची त्यांनी चर्चा केली. मुलांनी नांगरण्याच्या कामात भाग घेतला नाही. परंतु त्यांनी पेरणी केली, तण काढले, पाणी दिले, टोळधाडी आल्यावर औषधाची फवारणी केली आणि अखेर पिकाची काढणीही केली. शिक्षकांनी तयार केलेल्या तक्त्यांनुसार त्यांनी योग्य वेळी निरनिराळ्या कामात भाग घेतला.

## प्रत्यक्ष निरिक्षणाचे तक्ते:

शिक्षकांनी प्रत्यक्ष निरीक्षणाची नोंद करून ठेवण्यासाठी तक्ते तयार केले व त्याच्या प्रती सर्व विद्यार्थ्यांना दिल्या. त्यानुसार मुलांनी पट्टीच्या सहाय्याने पिकाच्या रोजच्या वाढीची मोजणी करून ती लिहून ठेवली, तापमापकाद्वारे दररोजच्या तापमानाची नोंद केली, पर्जन्यमापकाच्या सहाय्याने पावसाची नोंद केली... या तक्त्यांवरून मुलांना वर्गात विज्ञान व गणित हे विषय शिकण्यासही मदत झाली. यातून बारकाईने निरीक्षण करणे, निसर्गाच्या सानिध्यात प्रत्यक्ष काम करणे अशा अनेक कौशल्याचा विकास झाला आणि तो देखील मजेने! आळस आणि झोपाळूपणा आपोआप निघून गेला.

## मुलाखतींची सत्रे:

शिक्षकांनी मुलाखतीचे वेळापत्रक बनवले होते त्याप्रमाणे मुले जोड्या करून शेतकऱ्यांना भेटली, त्यांना प्रश्न विचारून पारंपारिक आणि आधुनिक शेतीच्या पद्धतींची खूप माहिती मिळवली. त्यातून मुले भीती आणि लाजाळूपणातून बाहेर पडली, त्यांच्यात संवाद-कौशल्य विकसित झाले आणि पारंपारिक व आधुनिक शेतीची तंत्रे समजून घेण्याचा अनोखा अनुभव मिळाला.

## संग्रह:

शिक्षकांनी मुलांना निरनिराळ्या प्रकारची माती, चिखल, दगड, बियाणे, झाडांच्या साली, पाने व फुले असलेल्या लहान फांद्या, कणसे, पक्ष्यांची घरटी, पिसे, हाडे अशा वस्तू जमवण्यास मदत केली. या संग्रहाद्वारे आजूबाजूचा परिसर समजून घेण्यास मोठीच मदत झाली. मुलांनी आनंदाने या सर्व गोष्टी चिकटवून कुतूहलाने अनेक तक्ते तयार केले आणि वर्गात त्यांची चर्चाही केली.

## इतर शेतांना भेटी व निरीक्षणे

शिक्षक आणि मुले जवळपासच्या शेतांवर गेली आणि त्यांनी निरनिराळी पिके लावण्याच्या प्रयोगांचे तसेच सेंद्रिय शेती आणि आधुनिक पद्धतीची शेती यांच्यातील फरकांचाही अभ्यास केला. शेतकऱ्यांना भेटून त्यांच्या मुलाखतीही घेतल्या. त्यातून त्यांना व्यापारी पिके आणि सेंद्रिय शेतीच्या फायद्यांचे एक संपूर्ण चित्र उभे करता आले.

शेतीचे शिक्षण हा देखील एक व्यवसाय आहे. मुलांना केवळ सेंद्रिय शेतीच्या पद्धती अभ्यासपूर्ण रीतीने शिकवणे हा या प्रयोगाचा मुख्य उद्देश नव्हता. परंतु, शैक्षणिक प्रक्रियेची कामाशी सांगड घालणे आणि 'शिक्षणाची' योग्य अशी व्याख्या बनवणे हे यामागील खरे उद्दिष्ट होते.




भाषा विषय: (साहित्य)

# तण काढताना म्हणायची गाणी

तण काढताना, मळणी करताना म्हणतात तशी लोकगीते मी चिंचेच्या झाडाखाली म्हणत होतो. माझा आवाज काही चांगला नाही. परंतु मुलांची गाण्यातील तालाशी ओळख होऊन त्यांना त्यात रस वाटावा असा माझा प्रयत्न होता.

एक लोकगीत मी फळ्यावर लिहिले, त्या गाण्याचं वृत्त आणि छंद, प्रत्येक ओळीतील शब्दालंकार त्यांना समजावून सांगितले आणि प्रत्येक ओळीतील यमक आणि ताल देखील दाखवला. लोकगीतात प्रत्येक ओळीच्या अखेरीस काही त्याच अर्थाचे शब्द देखील नव्याने घालता येतात, ते देखील मुलांना समजावून सांगितले.  अंगाईगीत, भजन, प्रेमगीतं, आणि काही गूढ लोकगीतं मुलांच्या  ओळखीची असतात.

मुलांना हे समजलेलं नाही हे माझ्या लक्षात आले. मस्तान आणि मल्लिकार्जुन जमिनीवर रेघोट्या काढू लागले.

मग मी मुलांना गाण्याची एक एक ओळ तयार करून मला सांगायला सांगितले, म्हणजे सर्वांचे मिळून एक गाणे तयार होईल. प्रत्येक मुलाने मागल्या ओळीशी सुसंगत अशी एक ओळ बनवायची होती.

तोपर्यंत कावळ्याने एक घुबडाचं पिल्लू पकडलं होतं! घुबडाची इतर पिल्लं मग एका विचित्र आवाजात मोठ्याने ओरडू लागली. सगळी मुलं माना वर करून तो ओरडा ऐकू लागली. जयाने थोडा विचार करून धडा परत सुरू केला.

प्रत्येकाने एक एक ओळ तयार केली. त्या ओळींचे वृत्त आणि ताल जमवण्यासाठी मी मुलांना मदत केली. सगळ्या सूचना विचारात घेऊन मुलांनी गाण्याचा एक आराखडा तयार केला. पण शांतासारख्या तीन मुलांनी मात्र गद्य वाक्येच केली.  त्यांनी वृत्तातील ओळीचा आणि यमकाचा विचारच केला नव्हता. मग त्यातील काही शब्द बदलून आणि काही नवे घालून मी त्या वाक्यांच्या गाण्याच्या ओळी बनवल्या. पण मी हे शब्द बदलण्यासाठी विशेष प्रयत्न केला नाही. मी मुलांनाच योग्य ते शब्द शोधायला आणि जुन्या शब्दांच्या जागी घालायला सांगितले, कधी कधी मी त्यांना चार पाच शब्द सुचवले आणि त्या वृत्तात आणि तालात बसेल असा हवा तो शब्द निवडायला सांगितला. दोन्ही बाजूंनी चाललेला हा एक शोध होता. अखेर सर्व मुलांनी मिळून एक गाणं तयार केलं. ते पूर्ण झाल्यावर मी हाताच्या बोटांनी चुटक्या वाजवत ते गाणं म्हटलं! त्यानंतर मात्र त्या गाण्यातील यमक आणि ताल मुलांच्या लक्षात आले. त्यांना आश्चर्य वाटले! आता गाणं लिहिण्याचं एक नवीनच कौशल्य त्यांनी आत्मसात केलं होतं!

हे प्रात्यक्षिक झाल्यावर मी मुलांना सांगितलं, “उद्या आपल्याला मक्याच्या शेतातलं तण काढायचं आहे. आपले कष्ट विसरण्यासाठी आपण गाणी म्हणणार आहोत. आपल्याकडची मोठी माणसं तण काढताना गाणी म्हणायची. वास्तविक, सगळीच लोकगीतं काम करता करता तयार झाली... काम आणि गाणी काही वेगळी नाहीत. तुम्ही अशी ‘तण काढतानाची’ काही गाणी तयार करू शकाल का?”

मुलं जाऊ लागली. मी परत एकदा म्हणालो, “जेव्हा आपण काही लिहितो, रंगवतो किंवा काही इतर काम करतो, तेव्हा आधी काही क्षण थोडे चिंतन करावे लागते. आपल्याला जर तण काढण्यासाठी गाणं हवं असेल, तर मक्याच्या शेतासमोर बसून थोडा वेळ मनन करावं लागेल, मगच आपल्याला गाणं सुचेल...”

विजया आणि सुधीर ध्यानात मग्न झाले.

मुलांनी गाणी लिहिली! त्यात शुद्धलेखनाच्या चुका होत्या. पण गाणी लिहिण्यातल्या कल्पना आणि ताल आता त्यांना समजला होता. प्रत्येक वेळी विचार करून आपल्या भावना त्यांनी मोकळेपणाने गाण्यात मांडल्या. मला त्यांचा खरा अभिमान वाटला... माझ्या मुलांनी गाणी रचली होती!

आपण केवळ मुलांनी काय लिहिलंय, कसं लिहिलंय हेच पाहू शकतो असं नाही, तर मुलांची यामागची मानसिकता, त्यांच्या कुटुंबाची परिस्थिती, आर्थिक अडचणी आणि इतर अनेक अनेक बाबींचे यात प्रतिबिंब दिसून येते.

“या बायांनो, तण काढायला या!
बाप्यानो, तुम्हीही तण काढायला या!
या बाबांनो, रांगा करायला या!
बाबांनो, कालवे बनवायला या!
बायांनो, तुम्ही पेरणीला या!
बाबांनो, तुम्ही खत द्यायला या!
बायांनो, तुम्ही तण काढायला या!
बाप्यानो, तुम्ही जंतुनाशकं फवारायला या!
बायांनो, तुम्ही धान्याची कापणी करायला या!
या बाबांनो, धान्य पोत्यात भरायला या!
पोती भरा आणि गाडीत चढवा!
गाड्या भरा आणि पैसे मिळवा!
पैसे मिळवा, मग ते आपण सगळे वापरू!
सगळे मिळून मजेत राहू!”

जंगली, वय वर्षे ११.

जंगलीचं गाणं हे चांगल्या गाण्यांपैकी एक होतं. त्याच्या गाण्यात त्याने शेतीच्या कामांचा योग्य तो क्रम मांडला आहे, पुरुषांनी आणि महिलांनी करावयाच्या कामांची विभागणी देखील केली आहे. आणि अखेरीला त्याने नफा वाटून घेऊन आनंदाने, शांतीत राहण्याची इच्छा देखील व्यक्त केली आहे. तो फक्त ११ वर्षांचा आहे. हे ‘वाटून घेण्याची’ कल्पना केवळ ओठावरचे शब्द नाहीत, पण त्याची गरिबी, कुटुंबाच्या आर्थिक अडचणी, यांमधून ही ‘वाटून घेण्याची’ कल्पना त्याला सुचली आहे.

जे कोणी ‘चांगल्या’ शाळेत शिकतात, त्यांच्यात ही भावना यायला हवी. धर्मनिरपेक्षता, समाजवाद आणि एकोपा ही नीतिमूल्ये सहज शिकवता येतील. पण, या भावना मुलांमध्ये वाढीस कशा लावता येतील? त्या आपण होऊन ओळखून त्या ते सृजनात्मक पद्धतीने व्यक्त कशा काय करू शकतील? आणि ते त्याचा वापर कसा काय करतील? केवळ नीतिमूल्ये शिकवणे पुरेसे नाही. त्यांचा प्रत्यक्ष जीवनात उपयोग करता आला पाहिजे. धर्मनिरपेक्षता, समाजवाद आणि लोकशाही तसेच मानवी मूल्ये यांची गरज त्यांना स्वत:ला जाणवायला हवी...

कल्याणी या शाळेतल्या एका शिक्षिकेने जंगलीच्या कवितेला चाल लावली आणि सर्वजण ते गाऊ लागलो, केवळ शेतातील तण काढतानाच नव्हे, तर रस्त्यावरून जाता-येता, सगळीकडेच! जवळ जवळ दोन महिने त्याने आम्हाला वेडच लावले होते...

“तण काढा रे तण!
शेतात घुसलंय रे तण!
झाडांना पाणी नाही मिळत रे तण!
पिकं वाढत नाहीत रे तण!
दु:ख होतंय रे तण!
पाठ दुखतीय रे तण!
लोकांचं नुकसान रे तण!
वाढू नकोस रे तण!
आम्हाला सुखात ठेव रे तण!”

विजया, ११ वर्षे

११ वर्षांच्या रवीने नेहमीच्या पद्धतीने आयुष्याचा विचार केला:

“हिरव्या शेतातलं तण काढा
बायका पुरुष सगळे या!
शेतकऱ्यांनो या! लोकांनो या!
काम करत करत जगूया!
शेतकऱ्यांनो या!”

कल्याणीने तण काढण्याच्या या सगळ्या गाण्यांना चाली लावल्या आणि मुलांकडून त्यांचा सरावही करून घेतला.

शेतात काम करणे, शिकवणे आणि निर्मिती या वेगवेगळ्या गोष्टी नाहीत, तर त्यांचा एकमेकांशी जवळचा संबंध आहे, त्या एकमेकांशी निगडीत आहेत.



## भाषा विषय:

# शेतीचा शब्दकोश

शेवरीच्या झाडावर पोपट जमून आवाज करत आहेत. आमच्या वर्गाकडे तिचंही लक्ष आहे असं कोकिळा चिकूच्या झाडावरून मधून मधून सांगते आहे. एकमेकींना पकडण्यासाठी पळणाऱ्या खारी मुलांपर्यंत आल्या आणि घाबरून पळून गेल्या. शेतात वांगी, शेंगा वगैरे तोडायला आलेल्या कामगार महिला आपसात गप्पा मारत आहेत. शाळा सोडून, आजूबाजूचं सगळं वातावरण शांत आणि गंभीर आहे!

मी मुलांना म्हणालो, “आपल्याला शेतीही करायची आहे आणि त्याबरोबर इतर सगळे विषयही शिकायचे आहेत. म्हणून मला वाटतं की शेतीच्या कामात वापरण्यात येणारे सगळे शब्दही आपण शिकले पाहिजेत. भुईमूग, भात, भेंडी, विड्याची पानं.... गावातले शेतकरी जी काही पिकं घेत असतील, त्यासाठी आपले शेतकरी जे शब्द वापरतात, त्यांची आपण एक यादी करायला हवी. अशी यादी झाली, की मग आपण एक ‘शेतीचा शब्दकोश’ तयार करूया.

मुलांचे आम्ही तीन गट केले. एक गट व्हरांड्यात गेला. दुसरा गट चिंचेच्या झाडाखाली जमला. शेवटचा गट चिकूच्या झाडाखाली जमला. मी शाळेच्या पायऱ्यावर जाऊन बसलो. मधून मधून एखाद्या गटातली एकेक मुलं त्यांच्या शंका विचारायला माझ्याकडे येत होती.

प्रथम मुलांनी त्यांना माहित असलेल्या सर्व शब्दांची एक यादी केली. गटातील सर्वांनी मग ते शब्द शेतीशी संबधित आहेत की नाही याची चर्चा केली. काही वेळा त्यांनी शेतात काम करणाऱ्या महिलांचाही सल्ला घेतला. शाळा सुटल्यावर घरी जाऊन त्यांनी आपल्या आई-वडिलांनाही विचारलं आणि त्यानंतर पल्लीपाडूमधील शेतकरी सामान्यत: शेतीसंदर्भात वापरतात अशा १५० ते २०० शब्दांची यादी तयार केली.

असे शब्द जमवल्यावर मी त्यांना आणखी एक काम दिले. “आपल्या गावात शेतीसंबंधी वापरले जाणारे शब्द तुम्ही जमवले आहेत. हे काम चांगले केले आहेत. पण आपल्याला या शब्दांचा अर्थ माहित असायला हवा. पहिल्याने तुम्हाला माहित असलेला अर्थ लिहा. माहित नसेल तर शब्दकोशाची मदत घ्या. काही वेळा एका शब्दाचे अनेक अर्थ असतात. ते सर्व अर्थ लिहा. शब्दकोशात जर तो शब्द मिळाला नाही, तर तुमच्या घरच्यांना विचारा.”

आता मुले निघून न जाता माझ्याजवळ येऊन बसली. ते तीन गट करून बसले. शब्दकोश पाहताना त्यांना अनेक शंका आल्या. काही शब्द लिहिताना विनोदी वाटत होते, ते लिहिताना मुले हसत होती.

मस्तान, नागराजू, मल्लिकार्जुन आणि जंगली मुलींना काहीतरी टोपणनावे देऊन चिडवत होते. मुली मग चिडत होत्या. मग मुलीही मुलांना नावे देऊन ओरडू लागल्या, “मस्तान! मस्तान! ए लहानसा बैल!” “नागराजू! नागराजू! ए साप!” त्या माझ्याकडे येऊन तक्रार करायच्या आणि कधी तर रडू लागायच्या...

एक मुलगा दोन्ही पाय पसरून त्याच्यावर पुस्तकं ठेवून लिहितो; एक मुलगा एक पाय पसरतो आणि दुसऱ्याची घडी घालतो; एक मांडी घालून बसतो; एखादा न हलता स्तब्ध असतो; एखादा बडबड करतो, हसतो; कोणीतरी दुसरा गट काय करतो आहे ते पाहायला जातो आणि येताना कोणाला तरी टपली मारून येतो; कोणीतरी एखाद्याला नाव देऊन चिडवतो. पण तरीही सर्वजण मोठाले शब्दकोश घेऊन शब्दांचे अर्थ शोधत आहेत आणि आपल्या वहीत लिहून घेत आहेत!

आता त्यांच्याकडे शब्दांचे अर्थ देखील आहेत. बहुतेक अर्थ त्यांनी स्वत:च्या अनुभवातून लिहिले आहेत. आता आम्ही तिसऱ्या टप्प्यावर आलो आहोत.

आता मी हे शब्द त्यांना खऱ्या शब्दकोशाप्रमाणे वर्णानुक्रमे लिहायला सांगितले.

एका आठवड्याच्या परिश्रमानंतर शेतीत वापरले जाणारे शब्द मुलांच्या चांगल्या ओळखीचे झाले. त्यांना शब्दांमधील फरक, त्यांचा परस्पर संबंध, त्यांच्यातील ताल समजला. भाषेतील शब्दांचे महत्त्व त्यांच्या लक्षात आले, त्यांच्या लिखाणातील सौंदर्य समजले, ते शब्द आता मजेने वापरू लागले. हसत-खेळत, गाणी गात, भांडत, चिडवत असताना त्यांचं शब्दांशी नातं जुळलं...

शेवटी मी त्यांना म्हटलं, “प्रथम तुम्ही शब्दांची यादी तयार केलीत, मग त्यांचा अर्थ गोळा केलात. आता प्रत्येक शब्दाला योग्य असं चित्र काढता येईल का? उदाहरणार्थ, ‘विळा’ म्हटलं की तुम्हाला त्याचं एका लहानसं चित्र काढता येईल का? तसंच ‘पिकाची कापणी’ म्हटलं की ते दाखवणारं एका छोटंसं चित्र काढलं तर... काही शब्दांसाठी तुम्हाला एखादं दृश्य काढावं लागेल. तुम्ही जमवलेल्या शब्दांसाठी शक्य तेवढी चित्रं काढायचा प्रयत्न करा.



मी त्यांना दोन इंच रुंदीचे कागदाचे तुकडे दिले. दोन दिवस त्यांनी बरेच परिश्रम करून त्यांवर चित्रे काढली. जर त्यात काही चूक झाली, तर ते चित्र त्या शब्दासाठी योग्य आहे की नाही याबाबत आम्ही चर्चा करायचो.  आता मुलांना शब्द आणि त्यावरच्या चित्राचं नातं समजलं.

मी मुलांचे आभार मानले.  मी आणखी एक आठवडा बरेच काम केले आणि मुलांनी काढलेल्या चित्रांसह एक सुंदर ‘शेतीचा शब्दकोश’ तयार केला.

आपण स्वत: एक शब्दकोश तयार केला म्हणून मुले खूष होती.

किती शाळांमधील मुलांना अशी संधी मिळते... शब्दांचा गंध, चव, स्पर्श यातून शब्दांचा अनुभव...?

**विज्ञान विषय:**

**डाळींच्या बिया आणि इतर बिया**

सगळी मुलं तण काढायला गेली. त्यांनी कडुलिंब, चिंच, रिठे, मका आणि गवत यांची रोपं आणि अंकुर ओळखले आणि काढले. पाच मिनिटांतच ते सर्व माझ्याकडे परत आले आणि माझ्याभोवती गोल करून बसले.

झाडावर कावळे कर्कश स्वरात कावकाव करत होते. चिमण्यांचा गाण्याचा सराव चालू होता.  नारळाच्या झाडावरचे पोपट कलकलाट करत होते. मधून मधून खारी येऊन मुलं काय करत आहेत ते पाहून जात होत्या.  आमच्या बाजूच्या चिंचेच्या बनातून जाणारे कामकरी लोक आम्ही गोल बसून काय करत आहोत ते पाहून पुढे निघून जात होते...

मुलांनी शेतातून जमवलेले नमुने मी त्यांना व्यवस्थित ठेवायला सांगितले. त्यांनी ते जमिनीवर नीट लावून ठेवले.

पहिल्यांदा त्यांनी एक बी ठेवलं. त्याच्याशेजारी एक अंकुर आलेलं बी, तिसरा क्रमांक होता एक मुळं असलेला मोड. चौथा होता बी वरची टोपी पडून गेलेला अंकुर. त्याच्या शेजारी एक कोवळे रोपटे, मग त्याहून थोडे मोठे रोप आणि शेवटी होते एक पूर्ण वाढलेले, मुळे आणि फांद्या असलेले झाड. माझी फारशी मदत न घेता त्यांनी सर्व योग्य त्या क्रमाने लावले होते.

मुलांसमोर मी निरनिराळ्या बिया ठेवल्या.  एका आठवड्यापासून मी भात आणि हिरवे वाटाणे एका बशीत वाढवत होतो, आता त्याला कोंब आले होते...

मल्लिकार्जुनने अगदी बरोबर अंदाज बांधला, तो ओरडला, “आता अण्णा बी कसं वाढतं याबद्दल सांगणार आहे...”

मग आमचा संवाद सुरु झाला. मुलं बिया आणि वाढणाऱ्या रोपांचं निरीक्षण करत होती. त्यांनी त्या रोपांना हात लावला, वर-खाली करून पाहिलं आणि ती विचारांत गढून गेली.  जी मुलं एकमेकांशी भांडतात, चिडवतात, तीच मुलं बारकाईने निरीक्षण देखील करू शकतात.  खारी त्यांच्या आजूबाजूला पळत होत्या तिकडे त्यांचं मुळीच लक्ष नव्हतं.

मी जमिनीवर माझ्या बोटांनी चित्र काढलं. “आता आपण आणखी एक मजेची गोष्ट पाहूया. या बिया घ्या आणि त्यांचे दोन तुकडे करा...” मी त्यांना चिंच, कडुलिंब, रिठे, हिरवे वाटाणे, भात आणि मक्याच्या बिया दिल्या.

मुलांनी वरचं टरफल काढलं आणि चिंचुक्याच्या, कडुलिंबाच्या, आणि हिरव्या वाटाण्याच्या दोन भागांचं निरीक्षण केलं, पण भात आणि मक्याच्या बियांमध्ये त्यांना दोन भाग दिसले नाहीत.

घाईघाईने मस्तानने भात व मक्याच्या बियांचे दगडाने तुकडे केले, त्यांची पावडर झाली पण दोन भाग काही झाले नाहीत.

त्यांनी या बियांचं आणि वाढणाऱ्या रोपांचं निरीक्षण करावं असं मी त्यांना सुचवलं.  मी त्यांना एकदल बीज दाखवलं, आणि त्या धान्यात आणि पानांत काय फरक आहे असं विचारलं. त्यांनी उत्तर दिलं. एकदल, बियांवरील आवरण वगैरेंसारख्या झाडांच्या भागांची आणि बियांची शास्त्रीय नावं त्यांना माहित नाहीत.

“ही पहिली जाड पानं तर बिजातच होती. त्यांना पाणी मिळाल्यावर अंकुर आले.  या पहिल्या पानांमुळेच त्या अंकुराला मुळं आणि खोड येतात.  झाड मोठं झालं की ही पहिली पानं वळतात आणि गळून जातात. मग खोडातून बारीक हिरवी पानं येतात...” एकदल धान्य आणि पानं यांच्यातील फरक त्यांच्या लक्षात आला.

“कडुलिंब, चिंच, आणि हरभऱ्याला प्रथमच दोन पाने असतात, पण मका आणि भाताचं काय...?” मी विचारलं.

“काहीच नाही...”

“ते एकच बीज आहे...”

“त्यात दल कुठे आहेत...”

“पण बीज आणि दल म्हणजे एकच...”

त्यांची सगळी उत्तरं ऐकल्यावर मी त्यांना परत एकदा बियांचं निरीक्षण करायला सांगितलं. “निसर्गाचा चमत्कार पहा. काही बियांचे दोन भाग असतात, त्यांना आपण डाळीं म्हणतो. काहींच्या बियांचे दोन भाग नसतात... त्यांना आपण काय नाव द्यायचं?”

मला त्यांना ‘एकदल’ आणि ‘दविदल’ धान्य हे शब्द शिकवायचे आहेत. पण सरकारी पाठ्यपुस्तकात दिलेले शब्द मला त्यांना प्राथमिक शाळेत शिकवायचे नाहीत...

तिसरी आणि चौथीच्या सरकारी पाठ्यपुस्तकात खूप तांत्रिक शब्द शिकवायला सांगितलेले असतात.  विज्ञानाच्या पुस्तकात द्विदल धान्ये, मुळाचे प्रकार, परागिकरण, फलीभवन हे सर्व असते. सामाजिक शास्त्राच्या पुस्तकात लोकशाही, स्वातंत्र्य, सत्याग्रह, अहिंसा, सत्य, असहकार, स्वदेशी असे अनेक शब्द प्राथमिक शाळेतल्या मुलांवर लादले जातात. या वयाच्या मुलांना या शब्दांचा आशय, किंवा त्यांचा अनुभव नसताना त्याबद्दलची काही भावना निर्माण होईल का याबद्दल मला गंभीर शंका आहे.  ते शक्य नाही. या शब्दांशी त्यांचा काही संबंध नसतो, ते फक्त ते शब्द पाठ करून परीक्षेला बसतात...  ज्यांना पाठांतर जमत नाही, त्यांना चुकीचे मार्ग वापरावे लागतात! परीक्षेतील नापासांचे प्रमाण वाढण्यात आणि मुलांनी शाळा सोडण्यामागील हे एक महत्त्वाचे कारण नाही का?

इथे मला एकदल आणि द्विदल हे शब्द वापरायला आवडत नाही, पण त्याऐवजी दुसरे काय म्हणावे हे ही मला सुचत नाही...

जया जोरात टाळ्या वाजवून म्हणाली, “डाळींच्या बिया आणि डाळ नसलेल्या बिया.” माझी समस्या एकदम सुटली!

शाळेतल्या मुलांवर जे शास्त्रीय शब्द लादले जातात, त्यांच्यासाठी मुले त्यांना आवडतील असे शब्द आपणच शोधतात. माझी मुले याबाबतीत माझ्यापेक्षा अधिक हुशार आहेत! डाळींच्या बिया आणि डाळ नसलेल्या बिया... किती सोपे शब्द जन्माला आले आहेत! मजा म्हणून मी त्यांना शास्त्रीय भाषेतली नावे सांगितली, पण ती त्यांना लिहिता आली नाहीत.

“आमच्या शेतात आम्ही भेंडी, दोडका आणि मका लावला आहे. यातील कोणत्या ‘डाळींच्या बिया आहेत आणि कोणत्या नाहीत?”

दुसऱ्या दिवशी मी मुलांना वह्या आणि पांढरे कागद दिले आणि म्हणालो, “आता आपण डाळींच्या बिया आणि डाळ नसलेल्या बिया यांचं एक पुस्तक तयार करणार आहोत. आपण तुमचे दोन गट करूया. एका गटाने डाळींच्या बियांची निरीक्षणे करून ती लिहून ठेवायची आहेत

आणि दुसऱ्या गटाने डाळी नसलेल्या बियांची निरीक्षणे लिहायची. आणि त्यानंतर प्रत्येकाने आपल्या गटाच्या झाडांवर एक निबंध लिहायचा. आणि बियांच्या वाढीची आणि रोपांची चित्रं देखील काढायची..."

मुलं तिथून निघाली आणि आपापली कामं करू लागली. त्यांचे निबंध आणि चित्रं घेऊन मी डाळी आणि इतर बियांचे एक पुस्तक तयार केले.

'डाळीखेरीजच्या इतर बियांसाठी' मुलांनी लिहिलेली प्रस्तावना:

"सामान्यत: यांना गवतासारखी पिके म्हणतात. त्यांना गाठी असतात. त्यांची मुळे धाग्यासारखी असतात. त्यांचे खोडही बारीक आणि आखूड असते. ही फार नाजूक असतात. या पिकांना कणसे येतात. त्यांची पाने लांब असतात. बियांना अंकुर आले की त्यातून बी बाहेर पडत नाही. या बीचे दोन भाग नसतात... भात, मका, बाजरी ही या प्रकारची असतात. ही पिके अल्पजीवी असतात. यांना फांद्या फुटत नाहीत..."

हेमलताने नाचणीची निरीक्षणे नोंदवली आहेत:

"हे झाड आपण सहज उपटू शकतो. त्यात फारशी ताकद नसते. ते फार काळ जगत नाही. हे एखाद्या उंच वाढलेल्या गवतासारखे असते. याची पाने अरुंद आणि लांब असतात. हे झाड फार उंच नसते. याची फुले काळ्या-पांढऱ्या रंगाची असतात. नाचणीपासून नाचणीचे सत्त्व बनवतात..."

एक नैसर्गिक प्रक्रिया या दृष्टीने शिकण्याला प्रोत्साहन दिले पाहिजे. पाठ्यपुस्तकातील शास्त्रीय शब्द मुलांनी पाठ करण्याची काहीच आवश्यकता नाही. ८-१० वर्षांच्या मुलांसाठी ते फार कठीण होते.



त्यांच्यातील नैसर्गिक कुतूहल, निरीक्षणशक्ती आणि निर्मितिक्षमता विकसित होण्यासाठी जर आपण संधी दिली आणि त्यांचा अनुभव त्यांच्या शब्दांत मांडायला प्रोत्साहन दिले, तर त्यांची स्मरणशक्ती विकसित होते आणि ते आपण होऊन उत्तरे देतात. या अनुभवावरून माझे ठाम मत बनले आहे की मुले माझे शिक्षक आहेत आणि ते शिक्षकांनाही शिकवू शकतात. मात्र त्यासाठी आपण त्यांच्या जगात प्रवेश करण्याची गरज आहे.

## प्रत्यक्ष अनुभवाला पर्याय नाही असेच दिसते!

माझ्या ८ वर्षे वयाच्या मुलांच्या गटाला एकाच दिवशी, एकाच प्रकारे आणि एकाच प्रकारच्या जमिनीत मका लावायला दिला. साधारण ८ दिवसांनी त्याला अंकुर आले.

जमिनीतून ज्या दिवशी कोंब बाहेर आले, त्या दिवशी मी मुलांना चांगल्या भक्कम अशा सरळसोट काठ्या कोंबाशेजारी जमिनीत रोवायला दिल्या आणि त्यांच्या झाडांच्या वाढीचे दररोज निरीक्षण करायला सांगितले.

पहिले १० दिवस त्यांनी नियमितपणे निरीक्षण केले. त्यानंतर दर १५ दिवसांनी झाडाच्या वाढीची त्यांनी नोंद केली. पहिल्या दिवसांत त्यांचे कुतूहल चांगलेच चाळवले गेले. वाढ मोजली की ती मला सांगायला ते लगेच पळत यायचे.

"अण्णा! माझं रोप आज फक्त अर्धा सेंटीमीटरच वाढलं..." मल्ली म्हणाली.

"अण्णा! आमची झाडं आज दीड सेंटीमीटर वाढलीत..." मस्तान आणि नागराजू गर्वानं सांगत आले.

मल्लिकार्जुन रडव्या चेहऱ्यानं म्हणाला, "माझं रोप तर एक सेंटीमीटर देखील वाढलं नाही..." मी एक शंका मांडली, "आपण सगळ्या बिया एकाच दिवशी लावल्या, सगळ्यांना त्याच दिवशी कोंब आले. मग झाडांच्या वाढीत असा फरक का दिसतो आहे?"

सर्वजण विचारात पडले. मी पुढे म्हणालो, "तुमच्या रोपांना पुरेसं पाणी मिळतंय ना? जमीन ओली आहे की नाही? तुमची रोपं कुठे आहेत हे तुम्ही मला सांगू शकाल का? आणखी असेच काही प्रश्न विचारले. मुलं जमिनीचं परत एकदा निरीक्षण करून आली.

मल्ली दु:खी आवाजात म्हणाली, “अण्णा! माझ्या रोपाजवळची जमीन पुरेशी ओली नाही.” मल्लिकार्जुन आणि रवीने चिंचेच्या झाडाच्या सावलीत वाढणारी मक्याची रोपं निवडली. मस्तान, विजया, नारायण आणि ज्योतीने पुरेशी हवा, पाणी आणि सूर्यप्रकाश मिळणारी रोपं निवडली!

“म्हणजे, रोपांच्या वाढीसाठी पाणी गरजेचं असतं हे आपण शिकलो... रोपं सावलीत वाढत नाहीत...”

हे सर्व ते प्रत्यक्ष अनुभवातून शिकले आहेत.

त्यानंतरच्या दिवसांत नरसिंहुलु या आमच्या शेतमजुराबरोबर आम्ही शेतात खूप परिश्रमाचे काम केले. आम्ही पिकाला पाणी दिले, तण काढले, खत घातले, कणसे खायला आलेले पक्षी हाकलले, रोपांची वाढ, फुलोरा, फुलांचे फलीकरण, फळात लपलेले बीज या सर्वांचे निरीक्षण केले. कोवळ्या कणसांची चव घेतली, भेंडी आणि दोडक्याची भाजी खाल्ली. आणि हे सर्व करताना आम्ही अनेक विषय शिकलो आणि काम करताना त्याची मजाही घेतली.

पिकाच्या या ३ महिन्यांच्या काळात आम्हाला अनेक प्रकारचे अनुभव आले. प्रत्येक विषय मनाला भिडला आणि त्यातून शिकायला मिळाले. या काळातील सर्व निरीक्षणे आम्ही एका तक्त्यावर मांडून ठेवली. त्याच्या आधाराने आम्ही गणित व विज्ञानाचा आणखी अभ्यास केला.

त्याचबरोबर आम्ही खते, किटकनाशके, कीटक, झाडांचे रोग, कृमी, पशु, पक्षी, आणि उंदीर व खारी यांसारखे पिकांचे नुकसान करणारे प्राणी इतकेच नव्हे, तर अंधारात येऊन कणसे चोरणाऱ्या चोरांबाबतही शिकलो!

यात वनस्पतीशास्त्र, प्राणीशास्त्र, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र यांचा अभ्यास झाला तो वेगळाच! ज्याकडे विशेष लक्ष दिले जात नाही, पण जे सर्वात अधिक महत्त्वाचे म्हणून शिकायला हवे ते म्हणजे निसर्ग आणि प्राणीमात्र यांच्यातील नाते.

शाळेकडे जर एखादी लहानशी शेतजमीन असेल, मग ती शाळा स्वयंपूर्ण असो अथवा नसो, आपण त्याचा नाविन्यपूर्ण रीतीने उपयोग करू शकू. कोणत्याही पुस्तकातून कधीच मिळणार नाही असा विलक्षण अनुभव यातून मुलांना मिळेल. हे एक जिवंत शिक्षण ठरणार नाही का?

| पेरणीची तारीख | एकर | कोंब येण्याची तारीख | झाडांची वाढ -उंची | | | | | | पाणी दिल्याची तारीख | पावसाच्या तारखा | फुले येण्याची तारीख |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | दिवस १ | दिवस ३ | दिवस १० | दिवस १५ | दिवस ३० | दिवस ६० | | | |
| मका ६.८८ | १ एकर २० सेंट | ३.७.८८ | १ सें.मी. | १० सें.मी. | १३ सें.मी. | | | ६ फूट | २९.६.८८<br>२.७.८८<br>१३.७.८८<br>२.८.८८<br>१३.८.८८<br>२२.८.८८<br>२६.८.८८<br>८.९.८८<br>१५.९.८८ | ७.७.८८<br>१६.७.८८<br>२१.७.८८<br>२२.७.८८<br>१५.८.८८<br>२३.८.८८ | ऑगस्टचा दुसरा आठवडा |

| तण काढण्याच्या तारखा | खत दिल्याच्या तारीख | कीटकनाशक फवारणीची तारीख | कणसाचा आकार | पिकाचा कालावधी | पिकाची एकूण मिळकत | निरीक्षणे |
|---|---|---|---|---|---|---|
| ११.७.८८<br>१२.७.८८ | १३.७.८८<br>२.८.८८ | सुरुवातीला | ३० सें.मी. | ३ महिने | २,१०० रुपये | *डाळ नसलेले बियाणे<br>*खारीनी कोंबाची नासधूस केली. |

# पल्लीपाडूतील पिके - प्रत्यक्ष वृत्तांत

शेताच्या बांधावरून तोल सावरत चाललेल्या ज्योतीच्या हातात एक प्रश्नावली होती. कविता तिच्यामागून चालली होती, आपण पडू अशी तिला सारखी भीती वाटत होती! मी त्यांच्यामागे होतो आणि माझ्यामागे येणारा नारायण मोठ्याने नाट्यसंगीत गात होता. त्याच्याही हातात एक प्रश्नावली  होती.

मी त्याला थांबवलं आणि म्हणालो, “आपण कामाला चाललो आहोत. लोक आपल्या प्रश्नांची उत्तरं देतील किंवा देणारही नाहीत. कधी त्यांची इच्छा नसेल, तर कधी ते रागावतीलही. आपण त्यांच्याशी काळजीपूर्वक पद्धतीने बोलायला हवे, आपल्याला त्यांच्याकडून काही गोष्टी शिकायच्या आहेत असं म्हणून आपल्या प्रश्नांची उत्तरं देण्याची त्यांना विनंती करायला हवी.  तू जर असा गात राहिलास, तर आपल्याला कोणी मदत करेल याची मला शंकाच आहे.” नारायण हा मनस्वी आणि स्वतंत्र वृत्तीचा मुलगा आहे, त्याला आपले काम एकट्यानेच करायला आवडते.

पर्यावरणाच्या अभ्यासाचा भाग म्हणून, त्यांच्या गावात लावण्यात येणाऱ्या निरनिराळ्या पिकांची माहिती घेण्याची संधी मुलांना मिळावी म्हणून आम्ही एक  प्रश्नावली तयार केली होती. मुलांच्या जोड्या बनवल्या होत्या आणि प्रत्येक जोडीकडे एक प्रश्नावली होती. त्यांना वेगवेगळ्या शेतांवर जायला सांगितले होते आणि तिथल्या शेतकऱ्याशी किंवा तिथे जे कोणी काम करत असतील त्यांच्याकडून माहिती घ्यायला सांगितले होते. प्रत्येक प्रश्नावलीत उत्तर लिहायलाही जागा होती. एका मुलाने प्रश्न विचारायचे आणि दुसऱ्याने मोकळ्या जागेत उत्तर टिपून घ्यायचे.



ज्योती आणि कविता एका वांग्याच्या शेतात गेल्या. मी त्यांच्या पाठोपाठ गेलो. नारायण एका विडयाच्या पानांच्या मळ्याकडे गेला. शेतकरी वांग्याच्या शेतात काम करत होता. ज्योतीने आपली माहिती दिली आणि आपले काय काम आहे ते सांगितले, पण शेतकऱ्याने काहीच उत्तर दिले नाही. तो आपले काम करतच राहिला. मुलींनी एकमेकींकडे पाहिलं आणि माझ्याकडे वळल्या. मी त्यांना काहीच मदत केली नाही. ज्योतीने शेतकऱ्याला परत एकदा, तिच्या प्रश्नाचे उत्तर द्याल का असे विचारले. आपले काम न थांबवता, तो म्हणाला, “मी तुमच्याशी गप्पा मारत बसलो, तर माझं काम कोण करेल? ठीक आहे. विचारा…”

ज्योतीनं प्रश्न वाचून दाखवला आणि हातातले काम न थांबवताच त्याने उत्तर दिले.

“दादा, वांग्यासाठी कशा प्रकारची जमीन योग्य असते?” ज्योतीने विचारले. “वांगी कुठेही वाढतात, पण जमिनीत पाणी साचून राहिलं नाही म्हणजे झालं.” त्याने उत्तर दिले.

कविता बांधावर बसून उत्तर लिहू लागली. तिचे लिहून झाल्यावर ज्योतीने पुढचा प्रश्न विचारला. “या पिकावर कोणकोणते कीटक हल्ला करतात?” गावातील  भाषेत त्याने हल्ला करणाऱ्या किडीची यादी दिली.

या मुलाखातीच्या सुरुवातीला काहीशी भीती आणि साशंकता होती, पण अखेर त्यांना हवी असलेली पिकासंबंधीची सर्व माहिती त्यांना मिळाली होती. मुलाखत पूर्ण झाल्यावर मुलांनी शेतकऱ्यांचे आभार मानले आणि सर्वजण शाळेत परत आले.

सर्व मुले निरनिराळ्या शेतांत गेली होती, त्यांनी शेतकऱ्यांशी संवाद साधून भात, कपास, मका, ज्वारी, भेंडी वगैरे सर्व पिकांची माहिती गोळा केली होती.

काही शेतकऱ्यांनी मुलांशी सहकार्य केले नाही.  काहींनी थोडक्यात पण मुद्याला धरून माहिती दिली; तर इतर काही जणांनी खूप चांगला प्रतिसाद दिला आणि बरीच अधिक माहितीही दिली.  क्रिस्तय्यासारखी मुले कोणत्याच शेतावर गेली नाहीत, आणि झाडाखाली बसून एकाही शेतकऱ्याशी न बोलता संपूर्ण प्रश्नावली भरून दिली!

मुलांना हे काम फारच आवडले. शाळेच्या बाहेर जाऊन वेगळ्या प्रकारच्या लोकांना भेटून त्यांना प्रश्न विचारण्यात त्यांना मजा तर वाटलीच, पण मुलाखत घेण्याचे कौशल्यही शिकण्याची त्यांना संधी मिळाली. आठवड्यातील दोन तास आम्ही यासाठी दिले होते. मुलांनी केवळ पिकेच नव्हे, तर गावासंबंधीही माहिती गोळा केली.

मुलांना तासचे तास एका जागी बसायला आवडत नाही. त्यांना हालचाल करायची असते, भांडायचे, चिडवायचे असते आणि मारामारीही करायची असते... या प्रकारे त्यांच्यातील उर्जेला बाहेर पडण्याचा एक मार्ग मिळाला. ते शेताच्या बांधावरून आणि रस्त्यावरून चालत गेले, शेतातला ताजा मका, हुरडा आणि उस शेतात बसूनच खाल्ला... त्यांना मिळालेली मोकळीक आणि स्वातंत्र्य यांचा आनंद त्यांनी उपभोगला. त्यांचे व्यक्तिमत्त्व घडवण्यातील हे एक मोठे पाऊल आहे असे आम्हाला वाटते.

मुले जेव्हा त्यांचे चौकशीचे काम संपवून परत आली, तेव्हा ते जे काही नवीन शिकले होते त्याचे त्यांनी उत्साहाने आणि विस्फारलेल्या डोळ्यांनी वर्णन केले, त्यावरून त्यांना त्यातून किती आनंद मिळाला होता हे स्पष्टच दिसत होते. त्यानंतर विज्ञानाच्या निरनिराळ्या वर्गात त्यांनी जमवलेल्या माहितीच्या आधारे वेगवेगळ्या पिकांवरील अहवाल तयार केले. शांता, विजया आणि हेमलतानी वांग्याच्या पिकाविषयी आपल्या निबंधात लिहिले होते:

“योग्य मोसमात हे पीक घेतले जाते.  ते कोठेही वाढू शकते.  याला पाणी कमी लागते. ४५ दिवसात याला फळे येतात.  बी पेरल्यानंतर ५ दिवसांनी त्याला कोंब फुटतो. रोपे नंतर मोठ्या शेतात लावतात.  दर १० दिवसांनी त्यांना पाणी देतात.  कोंब फुटण्याच्या काळात गमाक्सीन आणि सेविन चा वापर करतात.  खारी या पिकाचे नुकसान करतात. पिवळा किडा आणि इतर कीटकही यावर हल्ला करतात. म्हणून एन्ड्रीन, रोगोर, इकलाक्स, पाराथिन, अशा किटकनाशकांची पिकावर फवारणी केली जाते. चांगल्या वाढीसाठी खत, सीएन, युरिया अशा खतांचाही वापर करता येतो. १५ दिवसांतून एकदा खते देतात...”

मुलांनी स्वत: ज्या गोष्टी शोधल्या असतील, त्या ते सहसा विसरत नाहीत. नेहमीच्या शाळेतील मुलाला डझनावारी प्रमेये आणि इतर माहिती ४ भिंतीच्या वर्गात बसून पाठ करणे म्हणजे शिक्षाच वाटते. शिवाय, सामान्यत: त्यांना आफ्रिका किंवा भूमध्य समुद्रासारख्या दूरवरच्या प्रदेशांची माहिती शिकवतात! त्यांना त्यांच्या गावाचा नकाशा कसा काढायचा हे देखील माहित नसताना त्यांना अकबराच्या साम्राज्याचा नकाशा सक्तीने पाठ करावा लागतो!

आजकाल, किती शाळांमधील मुलांना त्यांच्या शाळेबाहेरचे जग माहित करून घेण्याची संधी मिळते? किती शाळांमध्ये मुलांना स्पर्श, गंध, नाद आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्याद्वारे शिकण्याची संधी दिली जाते?

शेतीच्या निरीक्षणाचा तक्ता क्र. २

| विषय | शिकवण्याची उद्दिष्टे | विद्यार्थांचे उपक्रम | विद्यार्थ्यांकडून अपेक्षा | विद्यार्थ्यांकडून अपेक्षा |
|---|---|---|---|---|
| भाषा साहित्य | स्थानिक भाषेची जाणीव | लोकगीते, लोककथा, म्हणी व कोडी वगैरे जमवणे. | नेलोर, मेडक व अनंतपुर जिल्ह्यातील लोकगीते व लोककथांचे पुस्तक बनवणे | शेती व ग्रामीण वातावरणासंबंधी कथा, नवकाव्ये व पारंपारिक काव्ये यांची मुलांसाठी पुस्तके बनवणे. |
| | प्रमाणभाषा व बोलीभाषा यातील फरक समजून घेणे, पद्यरचना करणे व त्यांचे सौंदर्य समजून घेणे | शेतीसंबंधी शब्दांचा संग्रह करणे, पारंपारिक व लोकसाहित्यावर आधारित गोष्टींवर नाटके करणे. | ‘शेतीचा शब्दकोश’ तयार करणे | |
| | निसर्ग व पर्यावरण यांच्याबाबत जबाबदारीची भावना विकसित करणे. ग्रामीण संस्कृतीचा परिचय व समाजातील विषमता समजून घेऊन त्याबाबतची चर्चा | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| इतिहास | पारंपारिक व आधुनिक शेतीची तुलना. शेतीच्या तंत्रात होत गेलेला विकास | शेतकऱ्याच्या मुलाखती व पुस्तकांतून संदर्भ शोधणे. | पारंपारिक व आधुनिक शेतीसंबंधी पुस्तके तयार करणे. | शेतीच्या इतिहासाबाबत व नेलोर, मेडक व अनंतपुर जिल्ह्यांचा इतिहास यावर मुलांसाठी पुस्तक तयार करणे. |
| | संदर्भ पुस्तकातून माहिती मिळवण्याचे कौशल्य विकसित करणे | आदिवासींची शेती व त्यांच्या उपकरणांची माहिती घेऊन, चित्रे व वस्तू जमवून त्यांचा संग्रह करणे. | | |
| नागरिकशास्त्र | गावाच्या कारभाराची जाणीव निर्माण करणे | गावातील लोक, सरपंच, पंचायत सदस्य वगैरेंच्या मुलाखती घेणे | ‘आपली ग्रामपंचायत’ असे पुस्तक तयार करणे | |
| भूगोल | पृथ्वीचा गोल व नकाशा वाचता येणे निरनिराळ्या स्रोतांमधून माहिती गोळा करणे | पृथ्वीचा गोल व नकाशा वाचता येणे व नकाशा काढणे. जमीन, दगड व उपग्रहांनी घेतलेली छायाचित्रे यांचा संग्रह करणे. तापमान, पर्जन्यमान वगैरेंची नोंद करणे | नकाशातील ठिकाणे ओळखण्यास शिकणे. जिल्ह्याचा नकाशा तयार करणे | पृथ्वीचा गोल व जग आणि आपले गाव यांची आणि नेलोर, मेडक व अनंतपुर जिल्ह्यांचा भूगोल यांची मुलांसाठी पुस्तके बनवणे. |
| पदार्थविज्ञान | यंत्रे व अवजारांमागील शास्त्रीय नियम समजून घेणे. उपकरणे हाताळण्यास शिकणे. | यंत्रे व अवजारांची चित्रे काढणे. | अवजारांसंबंधी पुस्तक तयार करणे. | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रसायनशास्त्र | खते, कीटकनाशके, सेंद्रिय कीटकनाशके, जमिनीची सुपीकता वगैरेंची चर्चा | खतांसाठी खड्डे करून कंपोस्ट खत, गांडूळखत व वनस्पतीपासून कीटकनाशक तयार करणे | कंपोस्ट खत, गांडूळखत व कडुलिंबाचा रस याबाबत पुस्तके बनवणे | |
| प्राणीशास्त्र | कीटक, पक्षी व प्राणी यांच्यातील नाते समजून घेणे. | निरीक्षणाची तक्त्यात नोंद ठेवणे. पशु/पक्ष्याची चित्रे काढणे. कीटकनाशकाची माहिती घेणे. | पक्षी आणि कीटक व त्यांचा प्रतिबंध यावर पुस्तक तयार करणे | |
| वनस्पतीशास्त्र | निरनिराळ्या जीवनचक्रांचा अभ्यास, वातावरणातील बदलांचे निरीक्षण. झाडांचे महत्त्व समजून घेणे. | पेरणी, तण काढणे, कापणी... यासंबंधीच्या निरीक्षणाची नोंद ठेवणे. बिया, पाने, फांद्या वगैरेंचे नमुने गोळा करून संग्रह करणे | पेरणी, तण काढणे, कापणी...यातील कौशल्य शिकणे. झाडांची वाढ, आपली पिके, झाडे टिकण्यासाठी हवामानाची आवश्यक परिस्थिती यासंबंधी पुस्तके तयार करणे | प्रकाश संस्लेषण, पान, अन्नचक्र व त्याचा मनोरा यांची मुलांसाठी पुस्तके बनवणे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| गणित | शेतीच्या उपक्रमांशी गणिताच्या संकल्पनांची सांगड.वातावरणातील गोष्टीमागील तर्कशास्त्र . | जमीन, वर्ग, पाऊस, तापमान, वगैरेंची मोजणी करून निरीक्षणाचे तक्ते बनवणे. | | ‘शाश्वत शेती’ बाबत मुलांसाठी पुस्तक बनवणे. |
| सामाजिकशास्त्र | समाजाची रचना व सामाजिक विषमता समजून घेणे | लोकांच्या मुलाखती आणि पुस्तकांतून माहिती मिळवणे | प्राचीन समाजाबद्दल पुस्तक बनवणे | दलित व त्यांचे स्थान यावर मुलांसाठी पुस्तक बनवणे. |
| संस्कृती | शेतीमागचे तत्वज्ञान समजून घेणे, व्यवस्थित नोंद ठेवण्याचे कौशल्य विकसित करणे | लोकांच्या मुलाखती, छायाचित्रे, निवेदनाच्या टेप्स याद्वारे माहितीचे जतन. पोस्टर तयार करणे, शाळेत सण साजरे करणे. | शेतीशी निगडीत सणांचे पुस्तक तयार करणे | नेलोर, मेडक व अनंतपुर जिल्ह्यातील सांस्कृतिक प्रथांविषयी छायाचित्रांचा वापर करून माहितीपर गोष्टी तयार करणे |
| निसर्गातील वैविध्य | शेतीतील निरनिराळ्या प्रथा मुलांना समजावून सांगणे व शिकवणे | शाश्वत शेतीचा प्रयोग. इतर शेतांना भेटी देणे | निसर्गातील वैविध्यावर पुस्तक तयार करणे | शाश्वत शेती व नैसर्गिक शेती याविषयी मुलांसाठी पुस्तके बनवणे. |
| कला-कौशल्य | कल्पनेवर आधारित गोष्टी लिहिण्याचे कौशल्य विकसित करणे. | चित्रे काढणे, रंगवणे, मातीच्या वस्तू, मूर्ती बनवणे वगैरे. | रंगकाम, ‘कोलाज’, मातीच्या वस्तू बनवणे, कातरकाम वगैरे | |

# आपला परिसर हेच आपले पाठ्यपुस्तक

# स्वत:ची ओळख

शिक्षण म्हणजे

केवळ अभ्यासाचे विषय शिकणे नव्हे,

परंतु स्वत:ला शिक्षित करणे

जे. कृष्णमूर्ती

“लेटर्स टू स्कूल्स- २”

कृष्णमूर्ती म्हणतात की केवळ इंग्रजी, विज्ञान, गणित असे विषय शिकणे म्हणजे शिक्षण नव्हे, तर स्वत:बद्दल देखील शिकणे हे खरे शिक्षण होय. ‘विद’ म्हणजे माहित असणे. यात दोन गोष्टी येतात. एक म्हणजे भौतिक रचना, वर्तणूक, वृत्ती, भावना, आणि इतरांशी असलेले नाते समजून घेणे. आणि दुसरे म्हणजे, ‘स्व’ च्या मुळाशी जाणे... मी केले, मी खाल्ले, मी लिहिले, मी कमावले, मी शिकलो... या ‘मी’ खेरीज आपले काम पूर्ण होत नाही. म्हणून मुलाला या ‘मी’ चे मूळ जाणून घेण्यास मदत करणे हे खरे शिक्षण.

मी जेव्हा मुलांना शिकवत होतो, किंवा शिक्षकांना प्रशिक्षित करत होतो, तेव्हाही मी विद्यार्थीच होतो. अखेर, एकदा मोकळे वातावरण देता आले की शिकवायला उरतेच काय? आणि अनेक प्रश्न त्यांच्यासमोर ठेवले की मी मुलांना किंवा प्रशिक्षणार्थी शिक्षकांना चर्चा करायला सांगतो. भावनेच्या भरात त्यांचे आवाज चढतात आणि मुले व मोठे सगळेच जोरजोरात चर्चा करू लागतात; त्यांच्या अनुभवांच्या मुळाशी जाऊन चर्चेत रंग भरतात. बऱ्याच वेळा काहीतरी



निष्कर्ष निघतो पण काही वेळा काहीच हाती लागत नाही. मुले मग एकमेकांशी जुळवून घेतात आणि काही वेळा वर्गात रडारडही होते. आपल्या हेकेखोरपणाबद्दल त्यांना अपराधी वाटते. गणिताखेरीज तेलगू, विज्ञान यांसारखे वर्ग पारंपारिक वर्गांसारखेच दिसतात. जर कोणी ते पहिले किंवा त्यांचा आवाज ऐकला, तर ही शाळा आहे की गावची जत्रा, असेच कोणालाही वाटेल. ‘धडा’ यापासून जरी याची सुरुवात झाली असली, तरी त्यावरील उत्साहपूर्ण आणि जोरदार चर्चेतून मुलांच्या दडलेल्या भावना, त्यांचे व्यक्तिमत्त्व स्वत:चे मूल्यमापन करण्याची आणि आपल्या वागण्यामागील कारण शोधण्याची त्याची आश्चर्यजनक क्षमता... या सर्वांमधून एक भावना दिसून येते. हे जर खरे शिक्षण नसेल तर मग ते काय असेल?

शाळेतील मैत्रीपूर्ण वातावरण, कुटुंबासारखे नाते, एकमेकांना समजून घेण्यासाठी केलेली चर्चा... या सर्वांमुळे मुलांना आपल्यात खोलवर डोकावून पाहून विचार करण्यास आणि विकास घडविण्यास मदत झाली.

# योग्य शिक्षण

पुस्तकांपेक्षा निरीक्षण करूनच बहुधा तुम्ही अधिक शिकता... तुम्ही कोण आहात, कसे वागता, तुम्हाला राग का येतो, हेवा का वाटतो, का निराश होता... तुम्ही कसे आहात हे पुस्तकातून समजून घेण्यापेक्षा, जर स्वत:कडे नीट लक्ष दिले तर ते अधिक चांगले समजेल.

जे. कृष्णमूर्ती

"लेटर्स टू स्कूल्स- २"

काही थोडी पुस्तके वाचून खरे शिक्षण होत नाही, तर ते आजूबाजूच्या परिसराचे निरीक्षण करून आणि अनुभवातूनच होते. सर्वात महत्त्वाचे म्हणजे 'स्वत:चे निरीक्षण करणे'... खऱ्या शिक्षणाने मुलाला मानसिक क्षमता समजून घेण्यास मदत होईल.

मुलांच्या वागणुकीवर व रागावर नियंत्रण ठेवण्यासाठी आणि त्यांच्या इच्छा व आकांक्षाचे निरीक्षण करण्यासाठी आम्ही अनेक मार्गांचा वापर केला. काहींचा उपयोग झाला तर काही अयशस्वी ठरले. मुलांमध्ये बदल होणे हे उन्हाळ्यात पावसाची वाट पाहण्यासारखेच फोल ठरले. 'निरीक्षण करणे' याचे खरे उद्दिष्ट 'बदल घडवणे' असे होते का? माझ्यासाठी हे एक कायमचेच कोडे आहे.

मुले भांडतात. मुलगे मुलींना चिडवतात. जातींवरून एकमेकांना शिवीगाळ करतात. बारीक सारीक कारणावरून हातघाईवर येतात. आपली कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या टाळतात. अनेक गोष्टी वाया घालवतात. सृजन शाळेत निरनिराळ्या मानसिकतेची सर्व प्रकारची मुले होती. नारायणसारखी हट्टी, जयासारखी धीट, चिन्न नागराजूसारखी लाजाळू, सुधीरसारखी एकलकोंडी, मस्तानप्रमाणे आपलेच म्हणणे ऐकायला लावणारी, जंगलीप्रमाणे कामसू आणि विजयासारखी संवेदनशील देखील.

असेम्ब्लीच्या वेळी मुलांमधील गुण आणि अवगुण यांचे विश्लेषण करता येते. स्वार्थीपणा आणि हेवा या विषयांची बऱ्याच वेळा यात चर्चा होत असे. मुले आपल्या चुका प्रामाणिकपणे कबूल करत असत पण त्या सुधारण्यासाठी मात्र त्याची मदत होत नसे. जुन्या सवयी तशाच चालू रहात होत्या... कटकट, गडबड-गोंगाट आणि लहान सहान कुरबुरी...!

नारायण खोडकर होता. शेतातून जाताना तो कविता आणि सिनेमातील गाणी मोठ्याने गात असे, शेतकरी त्याला रागावत असत. ज्योती आणि कविता सुरुवातीला खूप भित्र्या होत्या, पण हळू हळू त्या त्यातून बाहेर पडल्या. त्या न विचारलेली माहिती देखील सांगू लागल्या. त्यातून त्यांची निरीक्षणशक्ती वाढली. मस्तान, मल्लिकार्जुन हुशार होते पण जोखीम घेण्यासाठी आळशीपणा करायचे. काहीतरी थातूर मातुर माहिती जमवून हात झटकून टाकायचे. क्रिस्तय्या तर बाहेर पडायलाच तयार नसायचा. तो एकटाच सगळी उत्तरं लिहून टाकायचा.

त्यांनी गोळा केलेली माहिती, ती जमवताना आलेले अनुभव या सर्वांची चर्चा होत असे. त्यांच्या मनात दडलेली भीती त्यातून बाहेर यायची, आपला आळशीपणा आणि लहान सहान चोऱ्या ते कबूल करायचे. यातून मुलांना आपली वागणूक चांगल्या प्रकारे समजायची आणि शिक्षकांनाही त्यांचे मूल्यमापन करायला मदत व्हायची.

सर्व प्रकल्पांमध्ये रोजनिशी लिहिणे महत्त्वाचे होते. त्या दिवसाच्या शाळेतील व घरातील सर्व घडामोडी मुले लिहित असत. फक्त शिक्षकच त्या डायऱ्या वाचत. मुले आपल्या आई-वडिलांशी आणि त्यांच्या मित्रांशी असलेल्या संवेदनशील नात्याबद्दल लिहीत तसेच त्यांच्या मनातील भीती, आनंद, त्यांची दु:खे, हे सर्व त्याच संवेदनशीलतेने आपल्या डायरीत लिहीत. विजया, सुधीर, रवी, नागराजू वगैरे आपल्या डायरीत सामाजिक व आर्थिक परिस्थिती बाबतही लिहीत. विजयाची डायरी कारुण्याने भरलेली असे.

त्यातून ते स्वत:ला प्रश्न विचारू लागले व त्यातून त्यांची प्रगती झाली. त्यांच्यात काही बदल दिसला की आपण काही बीज रोवले आहे आणि यथावकाश त्याला अंकुर फुटेल आणि बहर येईल असे आम्हाला वाटत असे.

# योग्य वातावरण

मुलांना उत्कृष्ठ तांत्रिक कौशल्य देणे म्हणजे ते आधुनिक जगात स्पष्टपणे आणि कार्यक्षमतेने सहभागी होऊ शकतील, आणि त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे ते एक परिपूर्ण व्यक्ती बनावेत यासाठी योग्य ते वातावरण त्यांना देणे हे या शाळांचे उद्दिष्ट, ध्येय आणि या मागचा विचार आहे.

जे. कृष्णमूर्ती

'ऑन एज्युकेशन'

योग्य वातावरणात मुले स्वत:ला चांगले समजून घेतात. तिथे एक व्यक्ती या दृष्टीने त्यांचा पूर्ण विकास होतो.

परंतु मी ज्या शाळांमध्ये काम केले त्या गावापासून दूर, शेतात होत्या. बागा, मळे, कुंपणे, मोठाले वर्ग, चांगली पुस्तके असलेली ग्रंथालये, सहकार्य देणारे कर्मचारी... हे सर्व असल्यावर मुलांसाठी शाळा चालवणे हा एक न विसरण्यासारखा खास अनुभव होता.

पल्लीपाडूच्या सुरुवातीच्या दिवसांत आम्ही मुलांचे वर्ग झाडाखाली घेत असू. काय शिकवले जात होते ते ऐकण्याबरोबरच मुले आणि त्यांचे शिक्षकही आजूबाजूला काय चालले आहे हे पहात असत... एकमेकींमागे पळणाऱ्या खारी, पानगळ. कोकीळेसारख्या पक्ष्यांचे आणि जवळपासच्या शेतात काम करणाऱ्या लोकांचे गाणेही ते ऐकत असत. मुले आनंदी असायची आणि त्यांना पूर्ण स्वातंत्र्य असे हा यातील सर्वात मोठा फायदा होता. चार भिंतीतल्या वर्गातला तणाव झाडाखालच्या वर्गात जाणवत नसे. मुलांमध्ये नेहमीप्रमाणे कुजबूज, चिडवाचिडवी, खोड्या हे सर्व चालू असे. पण महत्त्वाचे म्हणजे, आजूबाजूला जे दिसायचे त्याबाबत आलेली शंका ते सहज विचारायचे. त्यांच्या प्रश्नांची उत्तरे त्यांना मिळायची. जणू काही आजूबाजूचे वातावरण हेच आमचे पाठ्यपुस्तक होते! तसंच घुबडाची पिल्ले का ओरडतात त्याची कारणे आम्हाला कळत आणि सरडे आणि पालींच्याबाबतही आम्हाला खूप माहिती समजली.

'लक्ष' या शब्दाची व्याख्या करणे कठीण आहे. मल्लिकार्जुन वर्गात अस्वस्थ होता... जागा बदलत होता, कोणाचे तरी केस ओढत होता, कोणाला तरी आपले पेन टोचत होता. कधीतरी शेताकडे पहात स्वस्थ बसून रहायचा, आजूबाजूला काय चालले आहे याकडे त्याचे मुळीच लक्ष नसायचे. बऱ्याच वेळा मी शिकवत असताना मध्येच थांबून मी काय म्हणत होतो ते त्याला विचारत होतो, किंवा त्याला धड्यावरचे एक दोन प्रश्न विचारायचो. आश्चर्य म्हणजे तो त्यांची सहज उत्तरे द्यायचा. इकडे तिकडे चुळबुळ करताना, कोणाला तरी चिडवत असताना आणि दुसरीकडे कुठेतरी पहात असतानाही त्याचं मी काय शिकवत होतो त्याकडे लक्ष होतं. ते त्याला कसं जमत होतं? त्याच्या मनाची अवस्था कशी होती? माझ्यासाठी हे एक कोडंच होतं. सुधीर आणि विजयाचं नेहमी लक्ष असतं, ते शिक्षकाकडे पहात असतात. आपण जर त्याला 'लक्ष देणे' म्हणत असू, तर मग मल्लिकार्जुनला काय म्हणायचे?

यावरून मी असा विचार केला की मुलांचे जरी लक्ष नाही असे वाटले, तरी नैसर्गिक वातावरणात आणि पुरेसे स्वातंत्र्य असेल, तर कानावर जे काही पडते ते त्यांना समजते.

'वर्गाची सजावट' करण्यातून माझ्या एक गोष्ट विशेष लक्षात आली की मुलांची वाचन क्षमता दुप्पट झाली. शिवाय त्याने मुलांच्या स्वभावातही मोठा बदल झाला. अर्थात नेहमीप्रमाणेच, मुलांनी कामचुकारपणा केला तर मुलींनी अधिक उत्साह दाखवला. आपण काय केले आणि कसे केले याची मुलांना जाणीव होती... ते आपले काम इतरांना दाखवत होते आणि त्यावर टीका-टिप्पणीही करत होते, पण काही मुलांमध्ये न्यूनगंड दिसत असल्याचे माझ्या लक्षात आले. परंतु मी त्याकडे फार लक्ष दिले नाही. सामान्यत: वर्गात आनंदी आणि खेळीमेळीचे वातावरण होते.

काहीतरी करत असताना शिकणे मुलांना आवडते. नेहमीच्या तक्रारी आणि आवाजाच्या गडबडीतही मुलांना हातानी काही तरी करण्यात स्वारस्य होते. नेहमीप्रमाणे धड्यावर भाषण करण्याऐवजी ज्यात मुलांनी काही तरी करायचे असेल असे प्रकल्प आम्ही निवडले होते आणि त्यातून मुलांच्या मेंदूलाही खाद्य मिळत होते.

ते लवकर शिकू लागले, वाचण्याची आणि लिहिण्याची गती वाढली, पण विशेष महत्त्वाचे म्हणजे त्यांना कशात अधिक स्वारस्य आहे हे दिसू लागले... विजया लेखिका आहे, नागराजू कलाकार आहे, मल्लिकार्जुनचा शास्त्रीय प्रयोग करण्याकडे कल आहे, जया आणि जंगली यांना श्रमाची कामे करायला आवडतात, मस्तानमध्ये संघटनकौशल्य आहे. हे सर्व माहित झाल्यावर प्रत्येकाकडे खास लक्ष देऊन त्याला बळकटी देण्यात आली. अशा प्रकल्पांमधून शिक्षक आणि विद्यार्थ्यांमधील नाते अधिक दृढ झाले. भाऊ-बहिणी या नात्याने आम्ही अधिक जवळ आलो.

योग्य ते वातावरण निर्माण करण्यासाठी मुलांना स्वातंत्र्य देणे ही एक फार महत्त्वाची बाब आहे. शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यातील पारंपारिक नाते असण्याऐवजी आमच्यात आणि मुलांमध्ये एक चांगली समज निर्माण झाली. शिस्तीचा अभाव असलेल्या वातावरणात शिक्षकांची मुलांच्या जोडीने काही शिकण्याची मनापासून असलेली तयारी पाहून मुले स्वतंत्रपणे विचार करू लागली. त्यांच्या निरीक्षणशक्तीला चालना मिळाली आणि त्यांचे कुतूहलही वाढले. मी एकदाच या स्वातंत्र्याचा गैरवापर केला. माझा स्वत:वर ताबा राहिला नाही आणि एका मुलाला मी रागावलो आणि त्याला मारले. म्हणून त्या दिवशी मी उपवास केला.

मुलांचे स्वारस्य शोधून त्याला खतपाणी मिळण्यासाठी आम्ही योग्य ते वातावरण निर्माण केले याची आम्हाला खात्री आहे. मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा संपूर्ण विकास व्हावा यासाठीचे आमचे प्रयत्न चालूच राहिले.

# चांगुलपणाची सुरुवात

आपण जेव्हा परिपूर्ण व्यक्तीमत्त्वाबाबत बोलतो, तेव्हा आपल्याला केवळ अंतर्मुख होऊन स्वत:ला समजून घेणारी, शोध घेण्याची व स्वत:ला तपासण्याची आणि त्याहीपलीकडे जाण्याची क्षमता असणारी व्यक्ती, इतकेच अभिप्रेत नसते, तर ती व्यक्ती जे काही कार्य करेल, ते चांगलेच करेल अशी व्यक्ती. या दोन्ही गोष्टी एकत्रच असायला हव्यात. शिक्षणाचा हाच मुख्य उद्देश आहे. मूल जेव्हा शाळेतून बाहेर पडते, तेव्हा त्याच्यात अंतर्बाह्य चांगुलपणा मुरलेला असावा.

जे. कृष्णमूर्ती
'ऑन एज्युकेशन'

मुलांचे बाह्य व्यक्तिमत्त्व आणि त्यांचे अंतरंगही बदलेल अशा संधी त्यांना देणे शक्य आहे का? कोणत्याही शिक्षकाला हे साध्य करता येईल का? मुलांनी चांगले कवी, कलाकार, नट, शास्त्रज्ञ, गणितज्ञ किंवा उत्कृष्ठ तंत्रज्ञ बनावे यासाठी त्यांना प्रेरणा व प्रोत्साहन देणे शक्य आहे आणि बराच प्रयत्न केल्यास त्यात यशही येऊ शकते. परंतु मुले शाळेतून बाहेर पडताना त्यांचे व्यक्तिमत्त्व खऱ्या अर्थाने अंतर्बाह्य परिपूर्ण व सुंदर बनवता येईल का?



आई-वडिलांच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीचा मुलांवर मोठाच प्रभाव पडतो. त्यांच्या धर्माच्या आणि जातीच्या बंधनांचाही मोठाच प्रभाव दिसून येतो.

दररोज असेम्ब्ली सेशन संपताना ध्यान सक्तीचे होते. तसेच, आठवड्यातून एक - दोन वेळा आम्ही संध्याकाळीही ध्यान करत असू. बहुतेक सर्वजण त्याकडे गांभीर्याने पहात असत. जंगली, मस्तान, नारायण वगैरे विनाकारण खोकून किंवा शिंका देऊन ध्यान करताना त्यात अडथळा निर्माण करत असत. त्यांचा देवावर विश्वास असो अगर नसो, मी त्यांना त्यांच्या मनातील विचारांकडे सहजपणे लक्ष द्यायला सांगत असे. ज्योतीसारख्या मुलांना 'ओम' चा जप करायचा होता. मी ते मान्य केले कारण मला त्यांच्या विश्वासाला धक्का द्यायचा नव्हता. अशावेळी मस्तान आणि जंगली चुळबुळ करत असत. त्यांना स्वस्थ बसून आपल्या विचारांकडे शांतपणे बघणेही जमत नसे. ते केवळ १० वर्षांचे होते. पण तरीही त्यांच्या धर्माचा त्यांच्यावर केवढा पगडा होता. ही समस्या संवेदनशील रीतीने कशी काय हाताळावी?

एकदा मी मुलांना धर्मगुरुंच्या समाधीस्थळी घेऊन गेलो. मंदिरातील विहिरीच्या पायऱ्या उतरून मुले खाली गेली आणि पाय धुऊन आली. पण साधारण सात वर्षाच्या वयाची दोन मुले विहिरीच्या काठावरच उभी राहिली. मी त्यांना विहिरीतून पाय धुऊन यायला सांगितले. ते लाजले पण त्यांनी नकार दिला. ते दलित होते. मी त्यांना समजावण्याचा खूप प्रयत्न केला पण ते ऐकायला तयार नव्हते. सात वर्षांच्या मुलाला आपल्या जातीबद्दल आणि रितीरिवाजाची इतकी माहिती होती. जाती- धर्मातील ही दरी दूर केल्याशिवाय मुलांमधील आंतरिक आणि बाह्य चांगुलपणा कसा काय विकसित होणार?

कोणत्याही कामाची सुरुवात करण्यापूर्वी मी मुलांना शांतपणे ध्यान करायला सांगत असे. विजया, रवी, ज्योती, सुधीर नेहमी हा सल्ला ऐकत असत. पण इतरांना मात्र त्याची सवय झाली नाही.

झाडे, पशु-पक्षी यांच्याप्रती सहानुभूती बाळगण्याची आम्ही बऱ्याच वेळा चर्चा करत असू. बुद्ध, जिझस यांच्या गोष्टी मुलांना नेहमीच सांगत असू. पण काय उपयोग? चिंचेच्या झाडाला बहर आला की, झाडावर चढता येत नसल्याने मुले झाडाला दगड मारत असत. मला त्याचे वाईट वाटे. असेम्ब्लीच्या वेळी झाडाला दगड मारू नका अशी मी मुलांना विनवणी करत असे.



विशेष म्हणजे मुलांमध्ये काही गट होते. मस्तानचा गट, जयाचा गट, नारायणचा गट वगैरे. काही थोडे सुधीर आणि नागराजू सारखेही होते, ते कोणत्याच गटाचा भाग नव्हते. फळे वाटण्याच्या वेळी गट विशेष लक्षात यायचे, प्रत्येक गट दुसऱ्या गटाकडे दुर्लक्ष करायचा. सुधीर सारखी मुले आळशी असल्याने या सर्व प्रकाराकडे केवळ प्रेक्षकाच्या भूमिकेतून पहात असत.

त्यांच्यातील चुका दाखवून देण्याने किंवा अनेक गोष्टी सांगूनही मुलांवर काहीच परिणाम होत नसे. सहानुभूती, चांगुलपणा, नम्रता आणि हुशारी हे गुण मुलांमध्ये कसे विकसित होतील याचा मी नेहमी विचार करत असे.

# सामाजिक परिस्थिती

माझ्या विद्यार्थ्यांना आणि मुलांना हुशारी आणि प्रेम नसलेल्या जगाला सामोरे जायचे आहे. मी हे उपहासाने म्हणत नाही, पण ते खरोखरच तसे आहे आणि ते पदोपदी दिसून येते. त्यांना भ्रष्टाचार, हिंसाचार आणि निष्काळजीपणाला तोंड द्यायचे आहे. त्यांना त्याची भीती वाटते. एक जबाबदार व्यक्ती (मी हा शब्द खूप काळजीपूर्वक आणि मनापासून वापरला आहे) या नात्याने या सर्वाला तोंड देण्यासाठी आपण त्यांना कशी मदत करणार आहोत?

जे. कृष्णमूर्ती

'लेटर्स टू स्कूल्स-२'

खरं सांगायचं तर मुलं सहन न करण्याजोग्या सामाजिक वातावरणात रहात आहेत. माझे विद्यार्थी सामाजिक व आर्थिक दृष्टीने मागासलेले होते. काही दलित होते, काही खालच्या जातीतील होते. त्यांचे वडील संध्याकाळी दारू पिऊन घरी यायचे आणि त्यांच्या आयांना मारायचे. रस्त्यात ते एकमेकांना शिवीगाळ करायचे. मुले अशा भयंकर वातावरणात वाढत होती. काही वडील सभ्य आणि आदरणीय असले, तरी त्यांच्यातील काही गुंड आणि चोर देखील होते. बहुतांश पालक रोजंदारीवर काम करणारे मजूर होते. त्यामुळे, शाळेच्या वेळेव्यतिरिक्तच्या वेळात त्यांच्या कामात मदत करणे सक्तीचे होते. विजया नदीवर जाऊन आई-वडीलांना कपडे धुवायला मदत करत असे. जया आणि मल्ली गुरं राखायच्या. ज्योती शेतातल्या कामात मदत करायची. नागराजू त्याच्या भावाबरोबर शहरात दूध विकायला जायचा. शांता तिच्या आईला खानावळीत मदत करायची. घरी त्यांना किती प्रेम आणि माया मिळायची हे माहित नसले तरी सर्वच मुले आणि मुली घरच्या कामात मदत करायची.

सुगीच्या दिवसात मुले शाळेत अजिबात न येता भुईमूग किवा कापसाची वेचणी करायला जायची.

आमच्या मुलांना त्यांच्या गरिबीची आणि त्यांच्या सामाजिक स्थानाची चांगलीच जाणीव होती. त्यांच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीची शाळेत कितीही तपशीलवार चर्चा केली असली, तरी त्यांच्या मर्यादा त्यांना माहित होत्या. त्यांच्यात कितीही देशप्रेम आणि

उत्साह असला, तरी आपल्या जातीच्या मर्यादा ते कधीच ओलांडत नसत. ते अधिक चौकस होऊ लागले होते आणि त्यांची निरीक्षणशक्ती खूप सुधारली होती आणि काही वेळा ते घरातील मोठ्या मंडळींना विरोध करत असत हे खरे होते. परंतु, त्यांच्या परिस्थितीची त्यांना पूर्ण जाणीव होती हे त्यांच्या डायरीवरून दिसून येत असे.

शनिवारची चर्चासत्रे केवळ काही मिनिटेच असत, काही वेळा ती देखील कंटाळवाणी होत. काही वेळा ती एका तासाहून अधिक वेळ चालत असत. अंधश्रद्धा वगैरेंसारख्या विषयांत मोठ्यांपेक्षा मुलांना अधिक स्वारस्य असे आणि ते आपली मते मोठ्या हिरीरीने आणि मनापासून मांडत असत. त्यांचा आवाज अजूनही माझ्या मनात घुमतो.

वरील उपक्रमाखेरीज मुलांना आपले धैर्य आणि ठामपणा दाखवण्यासाठी इतरही संधी मिळत असत. उदाहरणार्थ, शाळेच्या आवारातील एक झाड एका शेतकऱ्याने कापले. मुलांनी एकत्रितपणे त्यास विरोध केला आणि गावच्या सरपंचांकडे तक्रार केली. अशा असंख्य घटना होत्या. शाळेत ते जी तत्त्वे शिकले होते, त्यावरून त्यांना समाजातील खरी परिस्थिती शिकण्यास मदत झाली.

## संघटीत प्रयत्न

कोणत्याही ठरावीक गोष्टीपुढे न झुकणे हा शिस्तीचा खरा अर्थ आहे. लहानपणापासूनच आपल्याला धार्मिक किंवा सामाजिक साच्यानुसार वागायला आणि आज्ञापालन करायला सांगितले जाते. शिस्त ही बक्षिस किंवा शिक्षा यावरून ठरते. प्रत्येक विषयातच शिस्त अभिप्रेत असते: तुम्हाला जर उत्तम गोल्फ किंवा टेनिसपटू व्हायचे असेल, तर तुम्हाला प्रत्येक टोला वेळेवर आणि योग्य पद्धतीनेच मारावा लागतो. प्रत्येक खेळाचे काही नैसर्गिक नियम असतात. आपल्या आयुष्यातून असे नियमच नाहीसे झाले आहेत, त्याऐवजी अराजक, निर्दयता आणि सत्तेमुळे मिळणाऱ्या फायद्यासाठीची स्पर्धा यांनी त्याची जागा घेतली आहे. सामाजिक, वैयक्तिक आणि त्याहीपलीकडची आयुष्याची गुंतागुंत शिकणे म्हणजे खरी शिस्त नाही का...?

जे. कृष्णमूर्ती

'लेटर्स टू स्कूल्स – २'

'शिस्त' या शब्दाची व्याख्या करणे फारच कठीण काम आहे. शाळेत असताना मी कधीच कोणतीही शिस्त पाळली नाही आणि मुलांनाही ती कधी शिकवली नाही. त्यामुळे त्यांनी माझ्याकडे कधी फारसे लक्ष दिले नाही. त्यांना माझी कधीच भीती वाटली नाही. परंतु, एखादा नवा शैक्षणिक प्रकल्प हाती घेतला की मुले त्यासाठी मनापासून मदत करत. उन्हातान्हात काम करताना देखील त्यांचा उत्साह कधीच कमी झाला नाही. माझ्या वर्गात मुलांना सर्व प्रकारचे स्वातंत्र्य असे. ते एका जागी कधीच बसत नसत. खोड्या केल्या म्हणून मी त्यांना रागावत नसे. ते गलका करू लागले की मी त्यामागील कारणांचा विचार करत असे. गरीब मुले रिकाम्या पोटी शाळेत येत असत. मग त्यांचे शिक्षकांच्या शिकवण्याकडे लक्ष कसे लागणार?

मुले जे काही शिकतात त्यात जर त्यांचा प्रत्यक्ष सहभाग असेल, तर शिस्तीचा बडगा दाखवण्याची वेळ क्वचितच येईल, मग तो भाषेचा वर्ग असो की कला-कौशल्याचा. ते एकत्रितपणे शिकत आणि त्यात त्यांना खूप मजा येत असे.

रमा या माझ्या सहशिक्षिकेचा मुलांना ताब्यात ठेवण्याचा मार्ग निराळा होता. तिच्या काही थोड्या खाणाखुणांनी आणि डोळ्यांच्या हालचालींनी मुले शांत होत असत. अर्थात, प्रत्येकाचे स्वत:चे असे काही आडाखे असतात.

एक-दोन मुलांचा अपवाद वगळता, शारीरिक श्रमांबाबत मुलांना खूप उत्साह असे. गप्पागोष्टी करत काम करायला त्यांना आवडत असे. ते शाळा झाडून-पुसून साफ करत. त्यांनी खड्डेही खणले. त्यांनी सहजपणे वाळू वाहून नेली.

प्रत्येक मुलाला १० x १० फुटाचा एकेक वाफा भाज्या आणि फुले लावण्यासाठी दिला होता. पाणी देणे, तण काढणे हा रोजच्या कामाचा भाग होता. ते रिकाम्या पोटी आले असले, किंवा त्यांची मनस्थिती चांगली नसली, तर ते काही तरी सबबी सांगत. पण सामान्यत: हे काम चांगले होत असे. माझ्यात आणि मुलांमध्ये जर काही अंतर पडले असेल, तर ते लवकरच निवळत असे. शिक्षक असण्याऐवजी मी त्यांचा भाऊ बनलो होतो. त्यांना मी कधीच शिस्त शिकवली नव्हती आणि आम्ही काही विशेष न करताही त्यांना योग्य मार्ग कोण आणि कसा दाखवत असेल, याचा मी नेहमी विचार करायचो.

शिकण्याची साधने आणि संधी उपलब्ध करून देणे ही शिक्षकाची जबाबदारी आहे. शिस्त आणि लक्ष देणे हे शिकवता येत नाही. हे गुण मुलांमध्ये येण्यासाठी मी शांतपणे वाट पहिली. कालांतराने मला त्यांच्यात बदल दिसू लागला, पण त्याचे श्रेय कोणाला जाते याची मात्र मला खात्री नाही.

# निरोगी शरीर आणि मनाचे कार्यक्षेत्र

शिक्षण क्षेत्रातील माझे प्रयोग चालू ठेवण्यासाठी मी जे. कृष्णमूर्तींच्या शिकवणीतून प्रेरणा घेतली, आणि नंतर त्याला गौतम बुद्धाच्या विचारांची जोड दिली. तत्त्वज्ञानात किंवा सिद्धांतात न जाता शाळेतील मुलांच्या शारीरिक विकासाबाबतचे माझे अनुभव मी मांडणार आहे.

शारीरिक विकासासोबतच मानसिक कार्यक्षेत्राचा शोध घेण्याकडे कृष्णमूर्ती अधिक लक्ष देतात. उतरत्या वयात देखील ते योगासनांचा सराव करीत असत. ते शरीर ताठ ठेवून चालताना पाहणे किंवा ते सहजपणे जमिनीवर मांडी घालून बसताना पाहणे ही भाग्याचीच गोष्ट होती. शरीर निरोगी असेल तरच मनाच्या अंतरंगात उतरता येते... हाच तो संदेश होता!

गौतम बुद्धानेही शरीराला खूप महत्त्व दिले आहे. मनात जो विचार येईल, तो शरीर आपल्या 'संवेदनातून' व्यक्त करते. मनात जर राग निर्माण झाला, तर शरीरात दाह जाणवतो, श्वासात फरक पडतो व त्यातून तणाव निर्माण होतो. त्याचप्रमाणे, मनात समाधान असेल, तर शरीराला सुखद संवेदना मिळून शरीर हलके होते! म्हणून 'निर्वाण' किंवा 'आत्मज्ञान' प्राप्त होईपर्यंत शरीराच्या संवेदना समजून घेण्यासाठी गौतम बुद्ध ध्यान करण्याचा सल्ला देतात. मन व स्थूल शरीर यांच्यातील नाते समजून घेणे हे त्यांच्या मते फार महत्त्वाचे आहे. म्हणूनच, मुलांच्या शारीरिक वाढीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

माझ्या शाळेतील ५ ते ११ वर्षांची मुले अनुसूचित जातींतील व मागास वर्गीय होती आणि एक मुलगी अनुसूचित जमातीची होती. सर्वजण ग्रामीण भागातील होते. 'चिट्टी बाडी' या अनंतपुर शहराजवळच्या माझ्या शाळेत जेव्हा ही मुले आली, तेव्हा कुपोषण, पालकांचे दुर्लक्ष, बालमजूर म्हणून शेतात करावे लागणारे काम किंवा उन्हातान्हात गुरे चरायला नेणे, नाहीतर घरकाम वगैरेंमुळे बहुतेक सर्व मुलांना निरनिराळे आजार जडले होते.

खरुज, नायटा, उवा, केसातील कोंडा, तोंडाभोवती पांढरे डाग यांसारख्या गोष्टी सर्वसाधारण होत्या. शिवाच्या तोंडावर आणि हातापायांवर लाल डाग होते. बाबू तोतरा होता आणि त्याला शिकायला वेळ लागत असे. अनुसूचित जमातीमधील सुचरिता वेडी आणि कुरूप होती. ती चकणी, कुबडी आणि तोतरी होती. तिचे केस डोक्यावर सुयांसारखे उभे रहात. तिचा रंग लाल होता आणि तिच्या संपूर्ण शरीरावर गडद लाल आणि पिवळ्या रंगाचे डाग होते. रामंजनेयुलूत रक्ताची कमतरता होती, तो अतिशय कृश होता आणि नेहमी खोकत असे. मुलांनी मला सांगितले की ते आठवड्यातून एकदा अंघोळ करत असत आणि मुले ४-५ महिन्यातून केव्हातरी केस कापत असत... प्रत्येक मुलाला काहीतरी व्याधी होती.

आर्थिकदृष्ट्या ते सर्वच गरीब होते. सामाजिक दृष्टीने ते खालच्या जातीतील होते, त्यांच्यासाठी इतर सोयीसुविधा पुरेशा व समाधानकारक नसल्याने त्यांना आजार, अंधश्रद्धा आणि रूढी व परंपरा यांनी ग्रासले होते. दुष्काळी प्रदेशात असल्याने सततच्या दुष्काळाने त्यांच्या शिक्षणात व्यत्यय येत असे आणि त्यांना मजुरी करणे भाग पडे. त्यांचे आई-वडील कामासाठी दुसऱ्या गावाला गेले की ते अनाथ मुलांप्रमाणे गावात रहात असत.

सांस्कृतिकदृष्ट्या त्यांच्या काही श्रद्धा- विश्वास होते. त्यांच्या गावातील देव-देवता त्यांच्यासाठी फार महत्त्वाच्या होत्या आणि ते त्यांची जनावरे आणि शेतीशी संबंधीत सण साजरे करत असत. मंजुनाथ लिंगायत होता आणि शिव त्याच्यासाठी अतिशय महत्त्वाचा होता आणि त्याच्या धार्मिक श्रद्धा अतिशय ठाम होत्या.

ही मुले मला भेट म्हणून मिळाली होती. कोणत्याही परिस्थितीत समतोल टिकवून सहनशीलता अंगी बाणवायला त्यांनी मला मदत केली तसेच त्यांच्या शिक्षणासाठी पर्यायी मार्गही शोधायला लावले!

काहीतरी आध्यात्मिक बैठक असलेल्या मुलांना जबाबदार व परिपूर्ण नागरिक बनण्यासाठी समान संधी मिळणे आवश्यक आहे.

सकस, पौष्टिक अन्न आणि वर्गातील अभ्यास याबरोबरच मुले दररोज खालील गोष्टी करत असत:

शारीरिक व्यायाम व योगासने: शाळा सुरु होण्यापूर्वी सकाळी ८ ते ९ या वेळात मुले योगासने करत असत. श्वासाकडे लक्ष ठेवून उभे राहून, बसून आणि झोपून करण्याची मी त्यांना जवळ जवळ २५ आसने शिकवली होती. पाठीचा कणा, मान, कंबर, छाती आणि बोटांसाठी हा चांगला व्यायाम होता. यामुळे शरीरात फरक पडला आणि मनाची एकाग्रता वाढण्यासही मदत झाली.

निरनिराळे खेळ: शारीरिक शिक्षणासाठी स्वतंत्र शिक्षक नेमणे चिट्टी बाडीला शक्य नव्हते. मी केवळ साधे चेंडू, रिंग्ज, आणि जाळी नसलेला व्हॉलीबॉल त्यांना दिला होता. मुलांनी मैदानात एक खड्डा खणला आणि त्यात वाळू भरून त्याचा उंच उडी आणि लांब उडी साठी वापर केला. ते खो-खो आणि कबड्डी देखील खेळत असत. मुख्य दरवाजापासून वर्गापर्यंत असा एक १५ फूट रुंदीचा रस्ता मी तयार केला आणि त्यावर रोज पळण्याचा सराव करायला सांगितला. भालाफेक करण्यासाठी मी त्यांना एक लांब बांबू दिला. व्यावसायिक प्रशिक्षक नसला तरी मुले खेळत असत आणि त्यांना त्यात मजा येई. फावल्या वेळासाठी मी त्यांना एक बुद्धिबळाचा पटही दिला.

शारीरिक श्रम (बागकाम): ६ एकर शेतजमिनीवर ही शाळा होती. मी प्रत्येक मुलाला वर्गाजवळ ५ चौरस फुटांचा एक तुकडा आणि १० प्रकारच्या भाज्यांच्या बिया दिल्या... त्यांनी जमीन तयार केली, चर केले, खत घातले, कुंपण घातले... मुख्य दरवाजापाशी असलेला हातपंप वर्गापासून दीड फर्लांगावर आहे. मग मुलांना बादल्या दिल्या. तो एक चांगला व्यायाम ठरला. व्यायाम आणि अभ्यास यांची सांगड घातली. त्यांना निरीक्षण करण्यासाठी तक्ते बनवून दिले आणि त्यात झाडांच्या वाढीची निरीक्षणे करून त्यांची नोंद करायला सांगितली.

शाळेच्या मळ्यात लावण्यासाठी मी निरनिराळ्या प्रकारची फळझाडांची ७५० रोपे आणली. कामगारांकडून खड्डे खणून त्यात रोपे लावून घेतली. मुलांचे ३ गट बनवले. एका गटाने पंपाने पाणी काढायचे, दुसऱ्या गटाने ते काही अंतरापर्यंत वाहून न्यायचे आणि तिसऱ्या गटाने झाडांना पाणी घालायचे. दररोज ही कामे आळीपाळीने बदलत असू.

एका हंगामात आम्ही भुईमूगाचे पीक घेतले आणि त्यात मसूर, हिरवे चणे वगैरे आंतरपिकेही घेतली. तण काढण्यात आणि कापणी करण्यात मुलांचा सहभाग होता. ही पिके काढल्यावर ५ महिन्यांपर्यंत आम्हाला भुईमूग आणि मसूर विकत घ्यावे लागले नाहीत.

मुले माझ्याशी फार चांगली वागत असत. त्यांच्या सहकार्याचे वर्णन करायला माझ्याकडे शब्दच नाहीत. या सर्व कामात त्यांना मजा वाटे आणि त्यांनी मनापासून खूप श्रम घेतले. या सर्वाचा त्यांना शारीरिकदृष्ट्या आणि अभ्यासाठीही खूप फायदा झाला.

संध्याकाळचे फिरणे: रोज संध्याकाळी बागकाम आणि खेळ झाल्यावर मुले हातपंपावर जाऊन अंघोळ करायची. मग ते फिरायला जायचे. कधी कधी मी त्यांच्याबरोबर जात असे, कधी ते गटागटाने किंवा जोड्या करून जात असत. सहसा ते शेतातच फिरायला जात किंवा तलावाच्या काठावर नाही तर गावाकडे जाणाऱ्या रस्त्यावर. निसर्गाच्या सानिध्यात फिरत असताना ते केवळ शाळेच्या आजूबाजूच्या परिसरातील निसर्गाचे निरीक्षण करीत, इतकेच नव्हे, तर परत येताना शेतात तण म्हणून वाढणारी भाजीची पाने आणि कच्ची फळेही ते रात्रीच्या जेवणासाठी घेऊन येत असत. गावात फिरायला गेले की ते गावातल्या दुकानातून मिठाई घेऊन खात असत. त्यांना गावातल्या सगळ्या बातम्याही मिळत असत. शाळेत परत आल्यावर ते या सर्वाची तपशीलवार चर्चा करत असत.

ध्यान: आसने केल्यानंतर १५ मिनिटे ते ध्यान करत असत. यात ते आपला श्वास नैसर्गिकपणे कसा चालतो त्यावर लक्ष देत. अर्थात मनात इतर विचार आले की मुले श्वासावर लक्ष देणे विसरत. दोन विचारांमध्ये काही शांत क्षण मिळाले की ते स्वत:ची ओळख पटवण्यासाठी फार महत्त्वाची भूमिका बजावत. शांतपणे बसा आणि ही काही क्षणाची, मनाच्या आतील स्तब्धता अनुभवा असे मी मुलांना सांगत असे. या ध्यान धारणेमुले मुलांच्या बुद्धीची जलद वाढ होण्यास मोठीच मदत होत असे.

१० महिन्यानंतर मी मुलांच्या केवळ अभ्यासातील प्रगतीचाच नव्हे, तर कला कौशल्ये, आणि त्यांच्या शारीरिक प्रगतीचाही आढावा घेतला, तेव्हा वेड्या आणि कुरूप सुचरितासह त्या सर्व लहानग्या बुद्धांवर माझे प्रेम जडले!

इथे मला सांगायला लाज वाटत नाही किंवा मी अतिशयोक्ती देखील करत नाही, पण हे सत्य आहे. अनेक वेळा मला शिवा, रामंजनेयुलू आणि आता शहाणी झालेली, पूर्वी खूप त्रास देणारी वेडी सुचरिता या सर्वांना मिठी मारावी असे वाटत असे!

१० महिन्यानंतर सुचरितासह सर्व मुलांचे पूर्वीचे आजार नाहीसे झाले... त्वचेचे आजारही राहिले नाहीत. मानसिक भीती उरली नाही... रामंजनेयुलू शाळेत यायला लागला, तेव्हा सर्व मुले त्याच्या बरगड्या मोजत असत. त्याला नावे ठेवून चिडवत असत. पण लवकरच त्याच्यात सुधारणा झाली, स्नायूमध्ये ताकद आली आणि तो शाळेतला नेता झाला! मी देखील त्याचे मत विचारू लागलो. शिवाच्या शरीरावरचे डाग नाहीसे झाले आणि तो सुंदर दिसू लागला. सर्वच मुलांची तब्येत अशा प्रकारे सुधारली, चेहऱ्यावर रया आली, रंग सुधारला आणि शरीरे सुदृढ झाली.

केवळ शरीरातच नव्हे, तर मनाच्या खोल स्तरावर देखील या मुलांमध्ये 'खरा बदल' घडून येऊ लागला. सुचरिता सकाळी लवकर येऊन शाळेचे संपूर्ण आवार झाडून काढायची. बोअरवेल मधून एकटीनेच ती पिण्याचे पाणी आणून भरून ठेवायची, पृथ्वीचा गोल, फुलदाण्या असे शाळेतले सामान साफ करून नीट जागच्या जागी ठेवायची. ती अंघोळ करून व्यवस्थित कपडे करून, केस विंचरून शाळेत यायची. फारशा हुशार नसलेल्या बाबूने अभ्यासात विशेष प्रगती केली नाही पण छान स्वयंपाक करू लागला. शिवामधील कलाकार उभारून येऊ लागला. अनंतपुर जिल्ह्यातील दुष्काळाची चित्रे त्याने रंगीत पेन्सिलीने काढली आणि त्यात दुष्काळी भागातील शेतकऱ्यांच्या स्थितीचे चित्रण केले. रामंजनेयुलू गोष्टी चांगल्या रंगवून सांगत असे, तो आता गोष्टी लिहू लागला. सुचरिता तिच्या अंतर्मनातील विश्वाचे सुंदर चित्रण करू लागली.

मंजुनाथचा त्याच्या धार्मिक कर्मकांडावर मोठाच विश्वास होता. आम्ही जेव्हा मोहरम आणि नाताळवरचे शैक्षणिक प्रकल्प हाती घेतले, तेव्हा त्याने त्यास कसून विरोध केला. शिवाखेरीज इतर कोणत्याच धर्मातील देवाला किंवा संतांना मान देणे त्याला मान्य नव्हते. नाताळच्या वेळी त्याने येशूची मातीची मूर्ती बनवली नाही, मेणबत्ती लावली नाही, केकही खाल्ला नाही, बायबलमधला एक शब्दही त्याला ऐकायचा नव्हता... त्याने या प्रकल्पावर दोन दिवस बहिष्कार टाकला आणि ते दोन दिवस उपवास केला. इतर धर्मातील देवांची प्रार्थना केली, तर शंकर महादेव त्याला शिक्षा करेल अशी त्याला भीती वाटत होती. सर्व धर्मामधील एकता त्याला समजावण्यास बराच वेळ लागला.

सुचरिता वेडसर असल्याने मुले सुरुवातीला तिला चिडवत असत. ती त्यांच्या वह्या फाडत असे, पाट्या फोडत असे. ती इतर मुलांना चावायची, मारायची, केस ओढायची. तिच्या बाबतीत थोडा संयम ठेवा आणि तिच्याशी चांगले वागा असे मी मुलांना सांगत असे. ५-६ महिन्यात ती हळू हळू बदलू लागली!

# त्यांच्या आयुष्याची आणि वातावरणाची जाणीव

वन्नरू स्वामी हा एक १३ वर्षांचा मुलगा आहे. तो ५ वीत दोनदा नापास झाला. म्हणून त्याच्या पालकांनी निराश होऊन त्याला शाळेत पाठवणे बंद केले. त्याला शाळेत स्वारस्य नव्हते आणि तो लिहू-वाचूही शकत नव्हता.

हनुमंतुचे आई-वडील कर्जबाजारी होते, त्याची परतफेड करण्यासाठी तो एका शेतकऱ्याकडे थोड्याफार पगारावर काम करत होता.

वयाच्या १२ व्या वर्षी लग्न करून दिल्यामुळे जयलक्ष्मीची शाळा बंद झाली.

एका जुनाट आजारामुळे मरेन्ना अनियमितपणे शाळेत यायचा आणि तो चौथीत ओळीने चारदा नापास झाला होता. त्याचे आई-वडील गरीब आणि अंधश्रद्धाळू आहेत. मुलाला बरं वाटावं म्हणून त्यांनी ग्रामदेवतेला पशु बळी दिला.

सुब्बम्माला लिहिता-वाचता येत होतं आणि ती अभ्यासातही हुशार होती. पण तिच्या आई-वडिलांनी तिला घरकाम, स्वयंपाकपाणी करायला आणि लहान भावंडाना संभाळायला लावलं. म्हणून तिनं शाळा सोडली.

शाळाबाह्य मुलांसाठी पर्यायी मार्ग शोधताना त्यामागील कारणे आणि त्यांच्या समस्यांचा अभ्यास करणे आवश्यकच आहे.

बालविवाह, पालकांची निरक्षरता, गावातील वरच्या जातीतील लोकांचे वर्चस्व, अंधश्रद्धा, गरिबी, अस्पृश्यता, राजकीय खच्चीकरण, बेरोजगारी, सामाजिक विषमता, बालमजुरी, वेठबिगारी, स्थलांतर, सकस व पोषक अन्नाचा अभाव अशी अनेक सामाजिक व आर्थिक कारणे यामागे दडलेली आहेत.

शिक्षकांना प्रशिक्षण देण्यासाठी मी 'रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट' मध्ये रुजू झालो, तेव्हा या ट्रस्टच्या शाळांमधील दलित, अनुसूचित जमाती आणि मागासवर्गीय विद्यार्थ्यांची पातळी सुधारण्याची जबाबदारी माझ्याकडे सोपवण्यात आली.

शिक्षकांनी मला सांगितले की पालकांना राजी करणे हे फार कठीण काम आहे. मुलांना आणि त्यातही विशेषतः मुलींना शाळेत पाठवावे, त्यांना चांगले शिक्षण मिळावे असे पालकांना वाटतच नाही. मुले शाळेत यायची थांबली, की त्यांनाही परत शाळेत यावे, काही शिकावे असे वाटतच नाही.

ज्या गावांमध्ये एखादी स्वयंसेवी संस्था काम करत असते, तेथे स्वयंसेवक मुलांच्या घरी जाऊन त्यांना शाळेत घेऊन येतात आणि शाळा सुटल्यावर त्यांना परत घरी नेऊन सोडतात. हे स्वयंसेवकांचे कर्तव्यच आहे असे पालकांनाही वाटते. अनुसूचित जातींच्या पालकांना मुलांना शाळेत पाठवण्यासाठी राजी करणे फार कठीण आहे असे स्वयंसेवकांचे म्हणणे आहे. ठाम विश्वास आणि अंधश्रद्धा यामुळेही पालक मुलींना शाळेत पाठवायला तयार नाहीत. मुलांना शाळेत पाठवले तर कपडे, औषधे, पुस्तके, अन्नधान्य वगैरेंचा फायदा त्यांना मिळावा अशीही त्यांची इच्छा असते.

प्रत्येक वर्गात मुलांच्या पातळीत फार मोठा फरक असतो. अनेक मुले जरी ५वीत शिकत असली, तरी त्यांना अक्षरओळखही नसते. काहींना केवळ अ, आ, इ, ई... इतकेच येत असते. गणित अतिशय कच्चे असते. दरवर्षी त्यांना पुढल्या वर्गात ढकलण्यात येते पण ती त्यांची योग्यता नसते. याचा अर्थ ही मुले त्यांच्या वयानुसार ठरवण्यात आलेला अभ्यासक्रम पूर्ण करू शकत नाहीत. अनेक मुले नियमित शाळेत येत नाहीत... कदाचित, शेतीच्या हंगामात मुले काम करून पैसे मिळवण्यात पालकांना हातभार लावतात, किंवा त्यांना चार भिंतीत बसून काही शिकण्यात स्वारस्य नसते. अनेक गावांत शाळा गावापासून, विशेषतः दलित वस्तीपासून दूर असते.

या कारणांसोबतच शिक्षकांनी अभ्यासाशी संबंधित अशी काही कारणेही सांगितली. त्यांचे एक प्रमुख निरीक्षण असे होते की सरकारी शाळांतील शिक्षक मुलांची शैक्षणिक पातळी सुधारण्याची जबाबदारी घेत नाहीत. बहुतेक सर्वच सरकारी शिक्षक शाळेच्या गावी रहात नाहीत. म्हणून बरेचसे शिक्षक आपले काम नियमितपणे करत नाहीत आणि समाज किंवा पालक यांच्याप्रती ते स्वत:ला उत्तरदायी मानत नाहीत. बहुतेक सर्वच मुलांना शिक्षकांची अतिशय भीती वाटते. शिक्षक मुलांना योग्य मार्गदर्शन करत नाहीत आणि मुलांना पुरेसे प्रोत्साहनही देत नाहीत. शाळेत अनियमितपणे येणारी मुले आणि शिक्षणात मागे पडणारी मुले यांच्याकडे कोणी विशेष लक्ष देत नाही. बऱ्याच शाळांमध्ये विद्यार्थी व शिक्षक यांचे प्रमाण योग्य नाही. अनेक माध्यमिक शाळांमध्ये पुरेसे शिक्षक नाहीत आणि काही शिक्षकांना त्यांची पात्रता नसतानाही दोनहून अधिक विषय शिकवावे लागतात. अभ्यासक्रमाशी निगडीत इतर उपक्रमांचा अभाव, शिस्त नसणे, पुरेशा सोयी सुविधांचा अभाव आणि सरकारी शाळा चांगल्या प्रकारे न चालणे अशा गोष्टीही निदर्शनास आल्या.

अभ्यासक्रम आणि मुलांचे ज्ञान एका पातळीवर नसतात आणि शिकणे हा केवळ एक उपचार राहतो. मुलांची आकलनशक्ती कमी पडते. उदाहरणार्थ, मुले जरी ५ वीत असली, तरी त्यांना आपल्या वर्गाची पाठ्यपुस्तके लिहिता-वाचता येत नाहीत! ५ वीतील अनेक मुलांना केवळ अक्षरओळखच असते. सरकारी शाळेतील शिक्षकांची शिकवण्याची पद्धत चांगली नसते, त्यात रस नसतो, जबाबदारी नसते आणि एकूणच शाळेत शिक्षणासाठी योग्य असे वातावरण निर्माण केले जात नाही. वास्तविक, ही पद्धत शिक्षककेंद्री आहे आणि म्हणून शिकवलेला धडा मुलांना समजला आहे की नाही याकडे लक्षच दिले जात नाही.

पाठ्यपुस्तकातील तांत्रिक भाषा समजण्यास आणि लक्षात राहण्यास कठीण आहे. यापैकी बरेचसे शब्द संस्कृत आहेत. उदाहरणार्थ, ८-९ वर्षांच्या मुलाला 'एकदल बीज' किंवा 'भूगर्भजल' यांसारखे शब्द शिकावे लागतात. बरीचशी मुले नापास होतात आणि त्यांना '०' गुण मिळतात, पास होण्यासाठीचे किमान ३५ गुणही ते मिळवू शकत नाहीत. शिक्षक किंवा पालक कोणीच अभ्यासात मागे पडणाऱ्या, शिक्षणात गतिमंद असणाऱ्या मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष देत नाहीत. हुशार मुलांकडे ते अधिक लक्ष आणि प्रोत्साहन देतात. गतिमंद मुलांना मिळणाऱ्या शिक्षा आणि अपशब्दामुळे ते अधिकच निराश होतात. त्यांची तुलना हुशार मुलांशी केली जाते आणि त्यांना तसे बनण्याविषयी सांगितले जाते! या मुलांच्या अनेक पिढ्या शिक्षणापासून वंचित राहिल्या आहेत, त्यांच्या समाजाने अन्याय सहन केला आहे, त्यांच्यात अचानक असा बदल कसा काय होऊ शकेल? पाठ्यपुस्तकातील धड्यांचा मुलांच्या आयुष्याशी, त्यांच्या वातावरणाशी, त्यांच्या मानसिकतेशी आणि मानसशास्त्राशी देखील काहीच संबंध नाही!

या सर्व निरीक्षणाचे विश्लेषण केल्यावर परिस्थिती बदलण्यासाठी आणि मुलांना चांगले शिक्षण मिळावे यासाठी आम्ही पुढील काही पर्यायी मार्ग सुचवले:

गावातील आरोग्याची आणि स्वच्छतेची परिस्थिती सुधारण्यासाठी शिक्षकांनी काही जबाबदारी स्वीकारावी. पाठ्यपुस्तकाखेरीज प्रत्यक्ष वातावरणाशी संबंधित असा काही आराखडा तयार करून तो मुलांना शिकवावा. मधून मधून मुलांना गावातील रस्ते, विहीरी आणि हातपंपाभोवतालचा परिसर साफ करण्याच्या उपक्रमात भाग घ्यायला लावावा. तसेच तेथील सांडपाण्याचा निचरा कसा करावा हे ही शिकवावे.

शिक्षकांनी मुलांच्या सहभागातून गावातील व त्यांच्या घरातील प्रौढाना साक्षर करण्याची जबाबदारी काही अंशी तरी स्वीकारावी. गावातील मोठ्या माणसांना व आपल्या आई-वडिलांना गावातील वातावरणाशी मिळत्या जुळत्या पद्धतीने कसे लिहायला-वाचायला शिकवावे याचे मुलांना प्रशिक्षण द्यावे व त्याचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

शिक्षकांनी बालविवाह रोखावेत. त्यासाठी विशेषत: तिसरीच्या वरच्या वर्गातील मुलांना आणि विशेषत: मुलींना या सामाजिक कुप्रथेतील समस्यांबाबत माहिती देऊन जागरूक करावे.  त्यातून गावातील काही वाईट प्रथांची माहिती गोळा करून त्यांचा पाठ्यपुस्तकाच्या अभ्यासात समावेश करावा.

शिक्षकांनी दर महिन्याला पालकसभा आयोजित करून त्यांत मुलांबाबत सकारात्मक विचार मांडावेत. उदाहरणार्थ, मुलांना नियमित शाळेत पाठवणे, स्वच्छता व नीटनेटकेपणा, गृहपाठ पूर्ण करून घेणे, घरी अभ्यास करणे वगैरे. शिक्षकांनी अंधश्रद्धा, बालविवाहासारख्या वाईट सामाजिक व सांस्कृतिक प्रथा, मद्यपान, तसेच मुलांना धोक्याच्या कामाला न जुंपणे याविषयीही त्यांच्याशी संवाद साधावा.

शाळेतील शिकवणे गुणवत्तापूर्ण तर असावेच पण ते स्वारस्यपूर्ण असावे, मुलांना त्यात उत्साह वाटावा आणि त्यांना शाळेची गोडी लागावी. त्यासाठी काहीसे पाठ्यपुस्तकातून बाहेर पडावे लागेल आणि गावाच्या वातावरणाशी संबंधित असे विषय घ्यावे लागतील. त्यामुळे ती लिहायला व वाचायला लवकर शिकतील आणि त्यांच्या आयुष्याची व वातावरणाची त्यांना जाणीव होईल आणि त्यातूनच त्यांच्या जीवनात काही बदल घडून येण्याची आशा निर्माण होईल.

वरील गोष्टींचा विचार केल्यानंतर आम्ही प्राथमिक शाळांच्या सरकारी पाठ्यपुस्तकांचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न केला. तेलगू पाठ्यपुस्तकांत नैतिक कथा आणि कविता, देशभक्तीपर गाणी आणि गोष्टी, लोककथा, ऐतिहासिक आणि सामाजिक कथा, पत्रलेखन, आणि १-२ निबंध अशांचा समावेश होता. गणिताच्या पुस्तकात आकडे, पाढे, बेरीज-वजाबाकी, गुणाकार-भागाकार, प्रमाणे, जागेप्रमाणे आकड्याचे मूल्य वगैरे होते. समाजशास्त्र (परिसराचे शास्त्र-१) या पाठ्यपुस्तकात कुटुंब, गाव, ग्रहणे, ग्रह, निवडणुका, लोकसंख्या, उत्पन्न, न्याय, कायदा या सर्वांचा समावेश होता.  निसर्गशास्त्र (परिसराचे शास्त्र-२) यात शरीराचे अवयव, आजार, प्रथमोपचार, घरांची बांधणी, अवजारे, सकस अन्न, हवा, पाणी, पशु-पक्षी, कपडे, जमिनीचे प्रकार, हवामान, शेती, माशी आणि फुलपाखरे यांचा आयुष्यपट, वगैरेंचा समावेश होता.

हे धडे फारच सुयोग्य दिसतात! वास्तविक, यातील ५०% धडे पूर्णपणे असंबद्ध आणि ग्रामीण मुलांसाठी संदर्भहीन आहेत, केवळ पाठ करण्यापलीकडे त्यांचा काहीही उपयोग नाही. आणि यातील सर्वात मोठा तोटा म्हणजे बहुतेक सर्व पाठ्यपुस्तकामधील भाषा ही ब्राम्हणाच्या तोंडी असलेली संस्कृतप्रचुर भाषा आहे आणि दलित मुलांच्या भाषेशी आणि त्यांच्या संस्कृतीशी याचा दुरान्वयानेदेखील संबंध नाही. उदाहरणार्थ, तीर्थस्थळे, नद्या आणि देवांची वर्णने करणाऱ्या कविता या पुस्तकांत आहेत, त्यातून मध्यमवर्गीय आणि उच्चवर्णीयांची संस्कृती दिसून येते. अनुसूचित जाती व जमातीची (दलित) मुले केवळ परीक्षेत पास होऊन सर्टिफिकेट मिळण्यासाठी सक्ती म्हणून ते पाठ करतात.

सध्या प्रचलित शिक्षणव्यवस्थेच्या आपण विरोधात जाऊ शकत नाही. परंतु, अनुसूचित जाती व जमातीच्या मुलांसाठी आपण काही पर्यायी मार्ग निश्चितच शोधू शकतो. मग आम्ही सरकारी पुस्तकातील मुलांसाठी संदर्भहीन असणारे असे ५०% धडे काढून टाकले आणि गावातील वातावरण व सामाजिक परिस्थितीशी सुसंगत असे धडे त्याजागी घातले.

आम्ही कमला नावाची एका नायिका निर्माण केली आणि तिच्याविषयीच्या गोष्टीतून 'सीमा तेलगू' आणि 'वेकुवा' नावाची पुस्तके तयार केली.  ही वाचण्याची पुस्तके होती आणि त्यातच मुलांनी करण्यासारखा काही अभ्यासही दिला होता. यात तेलगू, सामाजिक शास्त्रे व गणिताचा समावेश केला होता. यात स्थानिक भाषेचे प्रतिबिंब होते आणि त्यातील सर्व अभ्यास खेळाच्या स्वरूपातील होते: वेगळेपण ओळखा, दिलेल्या अक्षरांचे शब्द बनवा, जोड्या लावा, शब्दकोडे, ओळखा, रिकाम्या जागा भरा, चित्रे काढा व रंगवा, नक्कल करा... वगैरे. शिक्षकांनी अभ्यासाची कार्डे तयार केली आणि त्यांच्या माध्यमातून मुले फार लवकर वाचू व लिहू लागली.  सुसंगत अभ्यासातून मुले खूप लवकर शिकू लागली, सुधारली आणि त्यांनी त्यांच्या इयत्तेसाठीची कौशल्ये हस्तगत केली.

या पुस्तकांमधून आम्ही हुंडा, बालविवाह, लिंगभेद, मद्यपान व जुगाराचे दुष्परिणाम, अंधश्रद्धा, निरक्षरता, अस्पृश्यता, वेठबिगारी, वाईट सवयी, कोरडवाहू जमिनीतील शेती, जमिनीची निगा, नैसर्गिक स्रोत व त्यांचे रक्षण, परसबाग व तिची निगा, गांडूळखत, सरकारी अधिकाऱ्यांकडे अर्ज पाठवणे, याचिका दाखल करणे, करार करणे, परिसर स्वच्छ व नीटनेटका ठेवणे, आरोग्य, वैयक्तिक स्वच्छता, सांडपाण्याची सोय, ऋतुप्रमाणे येणारे आजार, प्रथमोपचार, वनस्पतींपासून औषधे तयार करणे, बचत आणि अशा अनेक विषयांचा समावेश केला.

केवळ सुसंगत विषय निवडून ते शिकवण्याने परिस्थितीत सुधारणा होणार नाही, कारण त्यासाठी वर्गांचीही पुनर्रचना करावी लागेल. या व्यवस्थापनासाठी आम्ही ‘गट पद्धती’ सुरु केली. तिसरी ते पाचवीच्या वर्गांतील ज्या मुलांना अक्षरेहि ओळखता येत नव्हती किंवा ज्यांना थोडीशीच अक्षरओळख होती, अशांना ‘नव्याने शिकणाऱ्या’ गटात घातले. ज्यांना त्याहून थोडी अधिक अक्षरओळख होती, त्यांना ‘सर्वसाधारण’ गटात घातले. ज्या मुलांना चांगले लिहिता-वाचता येत होते त्यांना ‘प्रगत गटात’ घातले. नव्याने शिकणाऱ्या गटाकडे शिक्षक अधिक लक्ष देत. बाकीच्या गटांतील हुशार मुले गतिमंद मुलांना मदत करून त्यांची पातळी सुधारण्यास मदत करत.

अर्थात असे सुसंगत विषय शिकवतानाही अनेक अडचणी येत. तरीही ग्रामविकासाचे प्रशिक्षण असणारे शिक्षक देखील दलित मुलांना शिकवून त्यांचा भविष्यकाळ उज्वल बनवण्याचा आटोकाट प्रयत्न करीत. या नव्या पाठ्यपुस्तकांनुसार शिकवण्याचा प्रयत्न करणाऱ्या सर्व ग्रामीण भागातील शिक्षकांचा मी आभारी आहे.

# जिल्ह्याची पाठ्यपुस्तके

ज्ञात गोष्टीकडून अज्ञात गोष्टीकडे जावे असे शिक्षणाचे तत्त्वज्ञान सांगते. विद्यार्थ्याला जर आपल्या स्थानिक परीसराच्या मूळ संकल्पना समजल्या, तर त्यांना त्यामागील वैश्विक संकल्पना सहज समजून घेता येते. दुर्दैवाने, सध्याची शिक्षणव्यवस्था याच्या नेमक्या विरोधी पद्धतीने काम करते- म्हणजे माहित नसलेल्या बाबीपासूनच सुरुवात होते. शिवाय माहित नसलेल्या गोष्टी मुलांना पाठ कराव्या लागतात, त्यामुळे कळत-नकळत त्यांच्या नाजूक मनावर ताण येतो.

विद्यार्थ्याला जर त्याच्या स्थानिक वातावरणाची तेथील सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक प्रभावाची जाणीव असेल, तर त्याची आकलनशक्ती लवकर विकसित होईल; त्याची प्रगती समाधानकारक राहील आणि त्याची समजून घेण्याची व व्यक्त होण्याची क्षमताही वाढेल. हजारो वर्षांपासून अनेक पिढ्या शिक्षणापासून वंचित राहिलेल्या अनुसूचित जाती-जमातीच्या व मागासवर्गीय मुलांची शिक्षण घेणारी ही पहिलीच पिढी शिक्षणाचा फायदा घेऊ शकेल. परंतु या वंचित समाजातील मुलांना शिक्षण देणे हे सध्याच्या शिक्षणव्यवस्थेचे उद्दिष्ट दिसत नाही. त्यांना शिक्षण मिळाले, तर ते त्यांच्या हक्कांसाठी संघर्ष करतील, म्हणून मग शिक्षण हे अज्ञातापासून सुरु होते!

स्थानिक शाळेतील एका शिक्षकाला किमान १०० मुलांना शिकवावे लागते. पहिली ते पाचवी अशा सर्व वर्गांना ४ ते ५ विषय (तेलगू, गणित, सामाजिक शास्त्रे, विज्ञान आणि इंग्रजी) शिकवावे लागतात. म्हणून प्रत्यक्षात स्थानिक शाळेतील शिक्षकाला घाईघाईने अभ्यासक्रम पूर्ण करून परीक्षा घ्याव्या लागतात, त्यामुळे आजूबाजूची उदाहरणे देऊन, मुलांना अभ्यास समजतो की नाही याकडेलक्ष द्यायला त्याला वेळ नसतो, कारण मुले पास होतात की नापास होतात ही त्याची जबाबदारी नसते, तसेच तो स्थानिक समाजाला उत्तरदायी देखील नसतो. म्हणून अत्यंत वाईट परिस्थितीत अनुसूचित जाती-जमातीची आणि मागासवर्गीयांमधील शिक्षण घेणारी पहिली पिढी शिकू शकत नाही आणि शिक्षणात प्रगतीही दाखवू शकत नाही.

उदाहरणार्थ, तिसरीच्या वर्गाचे पाठ्यपुस्तक घेतले, तर त्यातून प्रत्यक्षात किती शिकता येते ते आपण पाहूया. सामाजिक शास्त्रातील पर्यावरण शास्त्र १ च्या पाठ्यपुस्तकात पुढील विषयांचा समावेश आहे:

*पृथ्वी, ग्रह व सूर्यमाला, खंडे व महासागर (जगाचा नकाशा व पृथ्वीचा गोल), अग्नीचा शोध (आदिमानवाचा इतिहास), चाकाचा शोध, भारत-आपला देश, आपली राज्ये, विविधतेतील ऐक्य, आपले राज्य- आंध्र प्रदेश, लोकांचे जीवन व व्यवसाय, हैद्राबादमधील महत्त्वाची ठिकाणे व स्मारके, पोन्डिचेरी, आपले सरकार (केंद्र सरकार, राज्य सरकार, संसद, लोकसभा, राज्यसभा, राष्ट्रपती, पंतप्रधान, मंत्रीमंडळ, न्यायालये वगैरे)*

या धड्यांमधून मुलांनी पुढील संस्कृतप्रचुर शब्द पाठ करावेत अशी अपेक्षा आहे:

*वातावरण, फर्दीनांड मेगालन हा पोर्तुगीज खलाशी, प्रवास, क्षितिज, किनारा, ग्रह, सूर्यमाला, कक्षा, पृथ्वीचा गोल, नकाशे, उत्तर व दक्षिण ध्रुव, विषुववृत्त, गोलार्ध, खंडे, महासागर, शोध, वाहतूक, पठार, वाळवंट, हिमालय, दक्खनचे पठार, घाट, बेटे, केंद्र व राज्य सरकार, संसद, राष्ट्रपती, पंतप्रधान, न्यायालये वगैरे...*

दुसरीत असताना नुकतीच अक्षरओळख होऊन लिहिण्याची व वाचण्याची कौशल्ये जेमतेम येऊ लागलेल्या ८ वर्षांच्या तिसरीतील मुलाला तो आजूबाजूला काय पाहतो आणि ऐकतो यांच्यामागील संकल्पना समजून घेण्याऐवजी त्याला सूर्यमाला, खंडे, आदिमानवाचा इतिहास आणि केंद्र सरकार याबद्दल शिकावे लागते... त्यानंतर त्याच्या गावाविषयी शिकण्याऐवजी त्याला आंध्रप्रदेश या राज्याबाबत शिकावे लागते. माहित नसलेले विषय! न समजलेले धडे पाठ करणे... गावातील उदाहरणे देऊन शिक्षकांनी हे माहित नसलेले विषय शिकवावेत अशी अपेक्षा!

तिसरीतील मुलांनी जगाच्या नकाशावर किंवा पृथ्वीच्या गोलावरील खंडे व देशाच्या नकाशावरून शहरे व राज्ये ओळखून दाखवायची आहेत. नकाशाच्या पुस्तकातून ठिकाणे कशी ओळखायची हे त्यांना यायला हवे! तेलगू किंवा भारतातील इतर स्थानिक भाषेतील तिसरी ते पाचवीच्या मुलांसाठी नकाशाचे पुस्तक उपलब्ध आहे का? प्राथमिक शाळेतील मुलांसाठी तेलगू शब्दकोश आहे का? राज्य सरकारने तयार करून पुरवलेल्या पाठ्यपुस्तकाखेरीज असे कोणतेच साहित्य बाजारात उपलब्ध नाही.

वाचनासाठी व अभ्यासासाठी कोणतेही साहित्य मिळत नसताना (विशेषत: अनुसूचित जाती-जमातींच्या व मागासवर्गीय मुलांची शिक्षण घेणारी पहिलीच पिढी असणाऱ्या मुलांसाठी) मुलांमध्ये केवळ पाठ्यपुस्तकांच्या वापरातून ही कौशल्ये कशी विकसित होणार?

या पार्श्वभूमीवर प्राथमिक शाळेतील मुलांसाठी आम्ही 'जिल्हा-पुस्तके' तयार केली.

'आपले गाव' नावाचे पुस्तक आम्ही तयार केले. यात गावातील वातावरणात शिकण्याच्या संकल्पनेचा आम्ही वापर केला. उदाहरणार्थ, गावाचा भूगोल व इतिहास, गावातील पिण्याच्या पाण्याची व्यवस्था, शेतीसाठी पाण्याची सोय, गावातील वीजपुरवठा, गावाचा नकाशा, बाजार, गावातील मंदिरे, आपल्या गावातील व्यवसाय, ग्रामपंचायत, गावाच्या आजूबाजूचा परिसर वगैरे. म्हणजे मुलांना गावातील लोक वापरत असलेल्या शब्दांमधून सरकारी पुस्तकातील शब्दांचा अर्थ कळेल.

'आपले गाव' हे पुस्तक शिकवत असताना नागराजू या सृजनस्कूल मधील १० वर्षांच्या मुलाने आपल्या गावाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले:

"माझ्या गावातले बरेचसे लोक शिकलेले नाहीत
खूप लोक मजुरीसाठी जातात
काही गुरे चरायला नेतात
गुरे चरायला नेणे त्यांना आवडते
या चित्रातील सिनैय्या म्हशी चरायला नेत आहे
तो माझा मित्र आहे
कधी कधी तो मला म्हशीवर बसू देतो
काही वेळा मीच म्हशीवर चढून बसतो
पुढच्या म्हशीचं नाव आहे रमण्णा
ती मला तिच्यावर बसू देते!"

सुरुवातीच्या या पायाभूत अभ्यासानंतर मुले जिल्ह्याचा इतिहास, भूगोल, जिल्ह्यातील उत्पन्ने, शेतीसाठी पाणीपुरवठा, जिल्ह्यातील शेती, जिल्ह्यातील नद्या, उद्योगधंदे, प्रशासन (जिल्हाधिकारी व जिल्हा परिषद), जिल्ह्यातील प्रेक्षणीय स्थळे, साहित्य तसेच जिल्ह्यातील नेते व महत्त्वाच्या व्यक्ती यांची माहिती या पुस्तकाद्वारे शिकली. यामुळे मुलांना आपल्या जिल्ह्याची ओळख होईल अशी अपेक्षा आहे. आणि या मूलभूत माहितीमुळे त्यांना आपले राज्य आणि आपला देश यांची माहिती समजण्यास मदत होईल आणि पाचवीनंतर ते जगाची माहिती करून घेऊ शकतील आणि त्यांना सरकारी पाठ्यपुस्तकातील शब्दही समजणे सोपे जाईल.

आंध्र प्रदेशाच्या तीन निरनिराळ्या भागात मला काम करता आले म्हणून मी स्वत:ला भाग्यवान समजतो. नेलोर जिल्ह्यातील पल्लीपाडू गावातील 'सृजनस्कूल' मध्ये मी काम केले तो भाग समुद्रकिनाऱ्याजवळ आहे; डेक्कन डेव्हलपमेंट सोसायटीची मेडक जिल्ह्यातील 'पच्चा शाळा' तेलंगण विभागात होती आणि मी स्वत: सुरु केलेली 'चिट्टी बाडी' अनंतपुर शहराजवळ रायलसीमा भागात होती. १९८८ ते १९९९ दरम्यान या तीनही शाळांत मी 'जिल्हा पाठ्यपुस्तकाचा' यशस्वीपणे वापर केला आणि तो प्रभावी ठरला. या प्रदेशातील बोलीभाषा आणि प्रथा निराळ्या आहेत पण गरिबी मात्र तीच आहे, अस्पृश्यता तीच आहे आणि अज्ञान आणि निरक्षरताही तीच आहे! 'सृजनस्कूल' मधील मस्तान, जंगली, जया, विजया वगैरे, 'पच्चा शाळेतील' फातिमा, नरसिम्म्मुलू, राजू वगैरे आणि 'चिट्टी बाडी'तील मंजुनाथ, बाबू, शिवा, रामंजनेयुलू, सुचरिता यांना मी कधीच विसरू शकणार नाही. जिल्ह्याची पाठ्यपुस्तके वापरण्यातील त्यांच्या सहकार्याबद्दल मी कायमच ऋणी राहीन.

ज्ञात गोष्टींकडून अज्ञाताकडे जाण्याच्या शिक्षणाच्या या प्रक्रियेमुळे शिकणे सोपे झाले. याचे परिणाम चांगले झाले, म्हणजे मुले किमान गुण मिळवून परीक्षेत पास झाली!! त्यांच्या गावातील वातावरणाची आणि जिल्ह्यातील सोयी सुविधाची त्यांना पूर्ण माहिती होती. जिल्ह्याच्या माहितीमधून ते देशाच्या व जगाच्या माहितीची सांगड घालू शकले.

अर्थात, सर्वच शैक्षणिक प्रकल्पांप्रमाणे या 'जिल्ह्याच्या पुस्तकां'चा अनुभव मिश्र स्वरूपाचा होता. भूगोलातील अक्षांश- रेखांश यांसारख्या गोष्टी जिल्ह्याच्या स्तरावर समजावून सांगणे कठीण होते. परंतु मुलांनी मातीचे पृथ्वीचे गोल तयार केले आणि त्यावर ते निरनिराळे देश ओळखू लागले, त्यातून त्यांना भूगोल काहीसा समजण्यास मदत झाली. मुलांनी मातीचा जिल्ह्याचा नकाशा तयार केला आणि त्यावर निरनिराळी शहरे, नद्या, प्रकल्प, पिके वगैरेंची दृश्ये साकारली. तसेच त्यांनी कागदाची विविध चित्रे चिकटवून जिल्ह्याचा नकाशा बनवला. जिल्ह्याच्या नकाशावरील निरनिराळी ठिकाणे दाखवण्याचा त्यांना लवकरच कंटाळा आला. जरी कठीण असले, तरी भूमातेची माहिती मिळवण्याचा अभ्यास त्यांनी आनंदाने केला. ते फारच थोडे शिकले, पण त्यातून ते जगाशी जोडले गेले आणि आपण कुठे आहोत हे त्यांना समजणे सर्वाधिक महत्त्वाचे होते. भूमातेविषयी शिकणे फारच सुंदर होते.

सृजनस्कूल मधील ८ वर्षांच्या मल्लीने लिहिले होते:

"भूमाते!

तू डोंगर, झाडे आणि आम्हाला कसे संभाळतेस?

आमच्यामुळे तू चिरडली जात नाहीस म्हणजे तू किती ताकदवान आहेस?

तू आम्हाला अन्न आणि खूप काही देतेस

पण आम्ही मात्र इतरांना काहीच देत नाही

आम्ही कसे आहोत!...

तू सारखी गिरक्या घेतेस

आम्ही का गिरक्या घेत नाही?

आम्ही जेव्हा मरतो

तेव्हा आम्ही तुझ्यात मिसळून जातो आणि माती बनतो!"

पेन्ना ही नेलोर आणि अनंतपुर जिल्ह्यातून जाणारी नदी आहे. दोन्ही जिल्ह्यात ती अतिशय निराळीच वाटते. पेन्ना नदीमुळे नेलोर जिल्ह्याला पिण्यासाठी आणि शेतीसाठीही पाणी मिळते. परंतु, अनंतपुर जिल्ह्यात पेन्ना नदी कोरडी आहे आणि लोकांना तिचा काहीच उपयोग होत नाही. अनंतपुर हा दुष्काळी जिल्हा आहे आणि नेलोर जिल्ह्यात सोमशीला हा मोठा प्रकल्प आहे. मुलांनी या नदीवर केलेल्या कवितांमधून आणि त्यांनी लिहिलेल्या स्वगतांमधून अनंतपुर जिल्ह्यातील दुष्काळाबाबतच्या आणि नेलोर जिल्ह्यातील उद्योगांनी केलेल्या प्रदूषणाबद्दलच्या त्यांच्या भावना स्पष्ट दिसतात. चिट्टी बाडीच्या मुलांनी या जिल्ह्यातील त्यांच्या गावातील दुष्काळाचे चित्रण जलरंग वापरून केले. सृजन शाळेतील (११ वर्षांखालील) मुलांनी जवळच्याच कागद कारखान्याला भेट दिली. कारखान्यातील व्यवस्थापन आणि कामगारांना भेटून कारखान्यातील दूषित सांडपाणी पेन्ना नदीत न सोडण्याची त्यांना विनंती करणे हा मुलांसाठी एक भावनिक अनुभव होता. जीविताच्या हक्काची मागणी करणे, नैसर्गिक स्रोतांचे जतन करण्याची मागणी हा एक मोठाच नवीन अनुभव होता. जिल्ह्याच्या या पाठ्यपुस्तकामधून त्यांच्या आयुष्यावर परिणाम करणाऱ्या अनेक गोष्टी त्यांना शिकता आल्या.

# वर्गाऐवजी गट ही पर्यायी व्यवस्था

१९८० मध्ये एक शिक्षक पहिली ते पाचवी पर्यंतच्या १०० मुलांना शिकवत असत. मुले एकापाठोपाठ ओळी करून बसतात. सामान्यत: ५ वीतील मुले सर्वात पुढे, शिक्षकांच्या जवळ बसतात आणि पहिलीची मुले शेवटच्या ओळीत. शिक्षक बहुधा आपल्या खुर्चीवर बसतात. पारंपारिक पद्धतीने शिक्षक एका वेळी एका वर्गाला शिकवतात आणि त्या वर्गातील मुलांना पुढे बसायला सांगतात. बाकीची मुले मागे बसून गप्पा मारतात किंवा भांडत बसतात. या पद्धतीत फारसे शिकणे-शिकवणे होतच नाही, आणि बहुतेक सर्व वेळ सर्व वर्गांसाठी नेमलेला अभ्यासक्रम पूर्ण करण्यातच जातो.

पहिली आणि दुसरीच्या मुलांना तेलगु अक्षरे, ५० किंवा १०० पर्यंतचे अंक आणि साध्या बेरजा व वजाबाक्या शिकवायच्या असतात. काही वेळा ते सर्वसाधारण पर्यावरण शास्त्राबाबतही शिकवतात. तिसरी ते पाचवीच्या मुलांना त्यांना तेलगू, गणित, सामाजिक शास्त्रे आणि विज्ञान विषयही शिकवावे लागतात आणि फक्त पाचवीच्याच मुलांना इंग्रजी शिकवायचे असते. सकाळी साडेनऊ ते

दुपारी साडेतीन या वेळात एकाच शिक्षकाला वेगवेगळ्या इयत्तेतील मुलांना एवढे सर्व विषय शिकवणे शक्य तरी आहे का? एकच शिक्षक मुलांच्या शिक्षणाची पातळी सुधारू शकेल का? एकच शिक्षक वेगवेगळ्या वयाच्या आणि वेगवेगळ्या वर्गातील १०० हून अधिक मुलांवर ताबा तरी ठेऊ शकेल का? (ज्या ठिकाणी मुलांची संख्या अधिक होती तेथे दशकाअखेरीस दोन शिक्षक नेमण्यात येऊ लागले.)

अशा परिस्थितीत आता ६ वीत म्हणजे माध्यमिक शाळेत जाणार आहेत, अशा ५ वीतील बऱ्याच मुलांना केवळ अक्षरओळखच झालेली असते! त्यांना त्यांच्या वर्गाची पाठ्यपुस्तके वाचता किंवा त्यानुसार लिहिताही येत नाही म्हणून ती वार्षिक परीक्षेत नापास होतात. परंतु राज्यसरकारच्या धोरणानुसार त्यांना पुढील वर्गात ढकलले जाते.

परिस्थितीचा काळजीपूर्वक विचार केल्यानंतर ग्रामीण विकास ट्रस्टच्या शाळांमध्ये 'इयत्तेनुसार गटरचना' नावाची एक नवीन पद्धत सुरु करण्यात आली. या पद्धतीत शाळेतील पाचही वर्गांमध्ये शिकणारी, म्हणजे सर्वच मुले ३ गटांत विभागण्यात आली: **नवशिक्यांचा गट, सर्वसाधारण गट आणि प्रगत गट**. विद्यार्थी कोणत्या वर्गात आहे याचा विचार न करता त्याच्या पातळीवरून हे गट बनवण्यात आले होते. उदाहरणार्थ, चौथी व पाचवीच्या वर्गातील काही मुलांना नीटशी अक्षरओळखही झालेली नव्हती. २ री ते ५ वीतील अक्षरेही न ओळखणाऱ्या मुलांना 'नवशिक्यांच्या गटात' (बिगिनर्स) घालण्यात आले. ते मुळाक्षरे आणि व्यंजने शिकतील. २ री ते ५ वीतील ज्या मुलांना मुळाक्षरे व व्यंजने येतात पण पूर्ण वाक्य करता येत नाही त्यांचा 'सर्वसाधारण गट' बनला. ज्या मुलांना चांगले लिहिता वाचता येत होते आणि जी हुशार होती त्यांना 'प्रगत' गटात घालण्यात आले.

संकल्पना या दृष्टीने पाहता हे चांगले नाही. हुशार, साधारण आणि 'ढ' अशाप्रकारे मुलांची विभागणी करणे मला वाईट वाटते. शिक्षणतज्ज्ञांच्या मते प्रत्येक मूल हुशारच असते. कौटुंबिक व सांस्कृतिक पार्श्वभूमी, सामाजिक विषमता यामुळे काही मुले शिकण्यात आणि आकलनशक्तीत मागे पडतात. आमच्या सोयीसाठी आणि त्यांच्या स्वतःच्या पातळीवरील मुलांशी स्पर्धा करत त्यांनी लवकरात लवकर शिकावे म्हणून ही विभागणी करण्यात आली होती.

परंतु मूल्यमापन केल्यानंतर या पद्धतीतील काही तोटे समोर आले. वरच्या वर्गातील मुलांना त्यांच्यापेक्षा खालच्या वर्गातील मुलांबरोबर बसून एकच अभ्यास करण्यात कमीपणा वाटू लागला. तसेच या पद्धतीत शिक्षकांना नेमलेला अभ्यासक्रम पूर्ण करणे शक्य नव्हते.

म्हणून १९८६ पासून वर्गानुसार गट बनवण्याची पद्धत अधिक फायदेशीर दिसून आली.

या पद्धतीत प्रत्येक वर्गाची मुले लहान गोलात बसतात. ३ री ते ५ वी चा प्रत्येक वर्ग दोन लहान गटात विभागण्यात आला होता: नवशिक्यांचा गट व प्रगत गट. लिहिता-वाचता न येणारी मुले पहिल्या गटात बसतात आणि लिहिता-वाचता येणारी मुले प्रगत गटात. त्यांच्याच वर्गातील समवयस्क मुलांबरोबर असणे मुलांच्या सोयीचे होते.

शिक्षक प्रथम एका वर्गाबरोबर असतात आणि तो पूर्ण झाल्यावर पुढील वर्गाकडे वळतात. काही वेळा शिक्षक त्या गटातीलच एक मुलगा नेता म्हणून निवडत आणि त्याला खालच्या वर्गांना मदत करायला सांगत. शिक्षक एका वर्गाला शिकवत असताना, इतर वर्गातील मुले लिहिण्याचे, वाचण्याचे, पाठ करण्याचे काम करतात किंवा चित्रे काढतात. वर्गानुसार बनवलेल्या गटामुळे वर्गात अधिक काम होते, मुलांचे व्यवस्थापन तसेच शिक्षक व विद्यार्थी यांच्यातील नाते देखील सुधारते.

सामान्यतः शिक्षक एक विषय ४५ मिनिटांच्या एका तासात शिकवतात. दिवसात मुलांबरोबर त्यांचे असे ४ ते ५ तास होतात. हे एकतर्फी शिकवणे असते, म्हणजे, शिक्षक शिकवतात आणि मुले ऐकतात. शिक्षक धड्यातील काही भाग वाचून २-३ दिवस त्यातील अर्थ व विषय उदाहरणे देऊन समजावून सांगतात आणि मग त्यावर गृहपाठ देतात. ४५ मिनिटांच्या भाषेच्या एका तासात ते ३ री ते ५ वीच्या मुलांना शिकवू शकत नाहीत... त्यामुळे प्रत्येक वर्गाचा अभ्यासक्रम पूर्ण करणे शक्य होत नाही. केवळ प्रेक्षक या नात्याने बाहेर राहूनच आपण शाळेतील एकुलत्या एक शिक्षकाला शिक्षणाची आणि शिकण्याची पातळी वाढवण्याबाबत बोलू शकतो!

गट पद्धतीमागील संकल्पना जर शिक्षकांच्या लक्षात आली- मग ती पातळीनुसार असो की वर्गानुसार- ते शिक्षक व विद्यार्थी अशा दोघांच्याही फायद्याचे ठरते.

गट पद्धतीत स्वतःहून शिकण्याला प्रोत्साहन मिळते. मुले गोल करून एकत्र बसली की ती एकमेकांना मदत करतात, स्वतःच्या चुका दुरुस्त करतात, काम पूर्ण करण्याच्या ईर्षेतून लवकर शिकतात. ते एखाद्या शब्दाबद्दल किंवा धड्याबद्दल चर्चा करू लागले की सर्वांनाच बोलण्याची संधी मिळते, आपले मत मांडता येते आणि लिखाणात, स्पेलिंगमध्ये चूक असली, तर ती हसत-खेळत गमतीत दुरुस्तही केली जाते. हे 'सहभागातून शिक्षण' होते. पारंपारिक वर्गांमध्ये,

पारंपारिक वर्गांमध्ये, जेव्हा मुले ओळीत बसतात, तेव्हा ती प्रश्नोत्तरे पाठ करतात, एकमेकांच्या मदतीने, खऱ्या अर्थाने शिकण्यापासून वंचितच राहतात. एकमेकांशी बोलता बोलता संथ गतीने शिकणारी मुले देखील काही महिन्यात सुधारणा करू लागली.

निरनिराळ्या वर्गातील मुलांना थोडक्या काळात सर्व विषय शिकवणे केवळ अशक्यच आहे! अभ्यासक्रम पूर्ण करणे ही आणखी एक अडचण आहे. मुलांवर ताबा ठेवणे, त्यांच्या भांडणात आणि खोड्या करण्यात डोके शांत ठेवणे यात शिक्षकांची मोठीच कसोटी लागते.

गट पद्धतीत शिक्षकांच्या कामाचा बोजा थोडा कमी होतो. या पद्धतीत शिक्षक प्रत्येक गटाबरोबर फक्त १०-१५ मिनिटेच घालवतात. मोठ्याने बोलण्याची गरज नसते. एका तासात एक धडा समजावून सांगण्याची जरूर नसते आणि मुलांना गप्प करण्यासाठी आपली सर्व शक्ती पणालाही लावली लागत नाही.

शिक्षकांना आम्ही 'मायक्रो' पद्धतीने शिकवण्याचे प्रशिक्षण दिले. शिक्षकाने धड्यातील काही संकल्पना निवडून शिकवण्यासाठी धड्याचे लहान लहान विभाग बनवायचे. धडा शिकवण्याचा आराखडा तयार करायचा आणि त्या लहानशा विभागानुसार मुलांना करण्यासाठी निरनिराळी कामे/अभ्यास वाटून द्यायचे. पुस्तकातील कमी महत्त्वाचे धडे काहीशा सहजतेने शिकवायचे.

सर्वसाधारण आणि प्रगत गटातून शिक्षकाने एक नेता निवडायचा आणि शिक्षकाने दिलेले काम/अभ्यास मुलांकडून कसा करून घ्यायचा हे त्याला शिकवायचे. तो नवशिक्या मुलांच्या गटाकडे विशेष लक्ष देऊन त्यांना अभ्यासात मदत करेल, त्यातून त्यांची शिकण्याची क्षमता सुधारेल आणि ते वर्गातील इतर मुलांच्या बरोबर येण्याचा प्रयत्न करतील.

'वर्क कार्ड' मध्ये जोड्या जमवा, वेगळेपण ओळखा, रिकाम्या जागा भरा, चूक की बरोबर ओळखा, दिलेल्या अक्षरातून योग्य शब्द बनवा, जिग्सो कोडी, चित्रे काढणे, चित्रे रंगवणे, प्रश्नोत्तरे, दिलेल्या उत्तरांमधून योग्य पर्याय निवडणे यांसारख्या अनेक बाबींचा समावेश करता येतो. प्रगत गटांसाठी शब्दांचे अर्थ, विरुद्ध अर्थाचे शब्द, स्वत: वाक्ये बनवणे व आकलन अशासारखे भाषेचे प्रश्न आणि गणितासाठी उदाहरणे सोडवणे यांचा समावेश करता येतो. या गटांनुसार वर्क कार्ड बनवण्यासाठी शिक्षकांना बरेच परिश्रम घ्यावे लागतात. दर महिन्याच्या १ तारखेला शिक्षकांच्या बैठकीच्या वेळी शिक्षक संपूर्ण महिन्यासाठी अशी कार्डे तयार करत.

सर्वसाधारण किंवा प्रगत गटासोबत शिक्षक ५-१० मिनिटे घालवत, धड्यातील एखादा परिच्छेद वाचून त्याचा अर्थ सांगत, मग वर्क कार्ड देऊन मुलांना स्वत:च त्यावरून अभ्यास करायला सांगत. मुलांना जर काही शंका असेल, तर ते दुसऱ्या गटासोबत असलेल्या शिक्षकांकडे जाऊन त्या शंकेचे निरसन करून घेत.

या पद्धतीमुळे मुले वर्क कार्ड घेऊन अभ्यास करत. ते जरी एकमेकांच्या हस्ताक्षराबाबत, स्पेलिंगच्या चुकांबाबत, चित्रांबाबत आणि अभ्यास करण्याच्या लकबीवरून टीकाटिप्पणी करत असले तरी त्यातून फार मोठी गडबड, मोठी भांडणे, फार वाईट वर्तन किंवा वर्गातून निघून जाणे वगैरे होत नसे. संपूर्ण शाळा अशा प्रकारे लवकरच लिहिण्या-वाचण्यात गढून गेलेली असे.

लवकर शिकणारी हुशार मुले आपले वर्क कार्ड लवकर पूर्ण करतात आणि शाळेत इकडे तिकडे जातात किंवा इतर गटांना त्रास देतात. म्हणून शिक्षक त्यांना चित्रे काढणे व रंगवणे, किंवा एखादी कविता व गोष्ट लिहिणे अशासारखे काहीतरी अधिकचे काम देत असत.

सामाजिक शास्त्रे आणि विज्ञान या विषयांसाठी पाठ्यपुस्तकावर आधारित वर्क कार्ड बनवून शिक्षक त्यांत भर म्हणून गावाविषयी, गावातील लोकांविषयी आणि त्यांच्या कुटुंबांविषयी माहिती गोळा करायला सांगत किंवा गावातील देवळाचा इतिहास, पंचायत कार्यालय, गावाचा नकाशा बनवा असे काही करायला सांगत. काही वेळा निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या लोकांची मुलाखत घेणे, शेतकऱ्यांना पिके, जमीन यांविषयी माहिती विचारणे अशा गोष्टीही करायला सांगत. या माहितीची नंतर गटात चर्चा करण्यात येई.

हा फार आदर्शवादी दृष्टीकोन झाला असे काहींना वाटेल. परंतु प्रत्यक्षात हा वर्गाच्या पर्यायी रचनेचाच भाग आहे. प्रत्येक शिक्षक त्याच्या प्रशिक्षकाच्या कल्पनेप्रमाणेच वागेल अशी अपेक्षा करता येत नाही. शिक्षकांमध्येही असामान्य आणि स्वारस्य नसणारे शिक्षक होतेच. कंटाळवाण्या शिक्षकांकडून या पद्धतीत फारसे चांगले परिणाम दिसून आले नाहीत. परंतु ज्या शाळांमध्ये सर्वसाधारण व असामान्य शिक्षक होते, त्या शाळांच्या गुणवत्तेची पातळी सुधारली. अनुसूचित जाती-जमातींच्या व मागासवर्गीय मुलांना याचा खूपच फायदा झाला. ज्या शाळांच्या प्रमुखांनी व शिक्षकांनी ही पद्धती अनुसरली आणि मुलांना शिक्षण मिळवून दिले त्या सर्वांचा मी आभारी आहे.

# गतिमंद विद्यार्थी

प्रत्येक वर्गात निरनिराळ्या मानसिक क्षमतेची मुले असतात. हुशार मुलांना एकदा ऐकून समजते; सर्वसाधारण मुलांना दोन-तीनदा सांगितले की समजते; गतिमंद मुलांना दहा वेळा समजावून सांगावे लागते आणि चौथ्या प्रकारची मुले अत्यंत ढ असतात की त्यांना समजतच नाही.

अत्यंत ढ मुलांबाबत शिक्षक काहीच करत नाहीत. त्यांची विशेष काळजी घ्यावी लागते आणि लक्ष द्यावे लागते. पहिली ते ५ वीच्या वर्गांसाठी असलेला एकच शिक्षक किंवा २-३ वर्गांसाठी असलेला एक शिक्षक मुलांची संख्या मोठी असताना अशा ढ मुलांची शैक्षणिक क्षमता वाढवण्यासाठी पुरेसे लक्ष देऊ शकत नाही.

पारंपारिक दृष्टीने शिक्षक हुशार मुलांकडे अधिक लक्ष देतात आणि त्यांची पातळी अधिक उंचावण्याचा प्रयत्न करतात. सर्वसामान्य विद्यार्थ्यांकडे शिक्षकांचे कधी लक्ष गेले तर त्याचे भाग्यच! गतिमंद विद्यार्थ्यांकडे शिक्षकांचे पूर्णपणे दुर्लक्षच होते. सामान्यत: प्रत्येक शाळेतील सुमारे ५०% पेक्षा अधिक मुले गतिमंद असतात.

घरी पालकही पुरेशी काळजी घेत नाहीत. पालकांची साक्षरता, त्यांचा आर्थिक स्तर, व्यावसायिक परिस्थिती व नातेसंबंध, सांस्कृतिक प्रथा, श्रद्धा, इतरांशी असणारे संबंध आणि त्यांचे मुलांशी असलेले संबंध... या सर्वांचा गतिमंद मुलांवर परिणाम होतो. कदाचित, त्यांची राहण्याची जागा अस्वच्छ असेल, आई-वडील आपसात भांडत असतील, ते मुलांना अभ्यासासाठी प्रोत्साहन देत नसतील, आणि काम करून कुटुंबासाठी पैसे मिळवणे त्यांच्यासाठी अधिक महत्त्वाचे असेल. त्यामुळेही मुले ढ होतात आणि काही विषय त्यांना लवकर समजत नाहीत.

देश स्वतंत्र झाल्यानंतरच अनुसूचित जाती-जमातींच्या आणि मागासवर्गीय मुलांना शिक्षणाची संधी मिळाली. सर्व पाठ्यपुस्तके, अभ्यासक्रम, शिकवण्याची पद्धत आणि परीक्षापद्धत ही वरच्या वर्गाच्या परंपरेनुसार असताना, या मागासवर्गीय मुलांनी वरच्या वर्गातील मुलांप्रमाणे लवकर शिकावे व त्यांच्याशी स्पर्धा करावी अशी अपेक्षा कशी काय करता येईल? मुलांच्या गतिमंदतेमागील हे देखील एक कारण असू शकते.

गतिमंद मुलांना चार भिंतीच्या आत वर्गात बसून शिकणे कंटाळवाणे वाटत असेल. त्यांना कदाचित चित्रकला, संगीत किंवा एखाद्या व्यावसायिक विषयात अधिक गोडी असेल, केवळ शिक्षणात गोडी वाटत नसेल. नावडत्या विषयांचा अभ्यास करणे किती कंटाळवाणे होते!

सरकारी शाळेत ३ रीत शिकणारा ८ वर्षांचा बाबू गतिमंद होता. तेलगु मुळाक्षराखेरीज त्याला काहीही येत नव्हते. तो 'चिट्टी बाडी'त आला. अत्यंत सहानुभूतीपूर्वक मी त्याला निरनिराळ्या गोष्टी खेळांमधून आणि अभ्यासाची कला कौशल्याशी सांगड घालून परत परत शिकवण्याचा खूप प्रयत्न केला. पण मी काय शिकवतो आहे ते त्याला समजतच नसे. बऱ्याच वेळा मी त्याच्याच भाषेत शिकवतो आहे ना याची मी खात्री करून घेत असे. सामान्यत: मी शाळेतल्या मुलांसाठी स्वयंपाक करतो. एक दिवस मी शाळेत नव्हतो, आणि माझ्या अनुपस्थितीत बाबूने भात, एका साधीशी आमटी आणि चटणी केली. परत आल्यावर त्याने बनवलेल्या पदार्थांची मी चव घेतली. घरी तो त्याच्या आईला स्वयंपाकात मदत करायचा असे त्याने मला सांगितले. त्याला नाचणीचा मुद्दा, आणि ३-४ प्रकारचे रस्से आणि चटण्या करता येतात असेही तो मला म्हणाला. वास्तविक, तो चांगला खाणारा होता. त्याला एखाद्या पाककलेच्या विद्यालयात घालायला हवे असे मला वाटले. पण त्यासाठी १० वी पास असण्याची गरज आहे. म्हणजे, प्रथम त्याला १० वी पर्यंत शिकणे भाग आहे, त्यानंतरच त्याला आपल्या आवडीचे व्यावसायिक शिक्षण घेता येईल. हे सर्व मी त्याला समजावून सांगितले आणि १० वी पर्यंतचा अभ्यास करायला सांगितले. पण त्याला किमान लिहिता-वाचताही येईना आणि पाठ्यपुस्तकही त्याला समजत नव्हते.

पर्यायी शाळेतील शिक्षकांसाठी गतिमंद मुले ही एक समस्या असते. आमच्याकडून शक्य ते सर्व प्रयत्न आम्ही केले, पण माळीकाम, स्वयंपाक, शेती, फळबागेची देखभाल, दूरचित्रवाणीसंच दुरुस्त करणे, घड्याळदुरुस्ती, स्कूटरदुरुस्ती, मोटर रिवाइंड करणे, रंगकाम, संगीत, नृत्य अशा प्रकारची व्यावसायिक कौशल्ये या मुलांना शिकवण्यासाठी आमच्याकडे व्यावसायिक प्रशिक्षक नव्हते. १० वी पास होण्यापूर्वीच जर त्यांनी ही कौशल्ये आत्मसात केली, तर त्यांना स्वतंत्रपणे जगण्याची संधी मिळू शकेल, मग ते १० वी उत्तीर्ण झाले नाहीत तरी फारसे बिघडणार नाही.

गतिमंद मुलांसाठी पर्यायी मार्ग शोधण्याचा आम्ही आटोकाट प्रयत्न केला, 'गट पद्धत' हा यातील एक पर्याय होता. दुसरा पर्यायी मार्ग होता 'वर्क कार्ड' चा. स्वयंशिक्षणासाठी याचा बराच उपयोग होतो.

सरकारी पाठ्यपुस्तकानुसार 'वर्क कार्ड' बनवणे सोपे आहे, पण त्यात काहीच अर्थ नाही. पुस्तकात दिलेला गृहपाठ करण्याने मुलांची आकलनशक्ती सुधारण्यास काहीच मदत होत नाही. सरकारी पाठ्यपुस्तके व अभ्यासक्रम यामुळे मुलांचे ज्ञान, आकलन, कौशल्य व त्यांचा

वापर करण्याच्या क्षमतेचा विकास होईल असे म्हणतात.  परंतु, वास्तवात ते फक्त ज्ञानालाच महत्त्व देतात आणि इतर तीन बाबींकडे फारच कमी लक्ष दिले जाते. प्रश्न अगदीच यांत्रिक पद्धतीने विचारले जातात. उदाहरणार्थ, "नेहरुंचा जन्म कुठे झाला? नेहरुंचे आई-वडील कोण होते? नेहरुंनी लिहिलेल्या दोन पुस्तकांची नावे सांगा..." मुलांना समजले आहे की नाही हे पाहण्यासाठी देखील 'खरे की खोटे सांगा' असे प्रश्नही यांत्रिकपणे तयार केलेले असतात: "नेहरू लेखक होते... (हो/नाही); नेहरू भारताचे राष्ट्रपती होते ... (हो/नाही)." यात विद्यार्थ्याला विचार करायला संधीच मिळत नाही! त्यांनी धडे जरी अनेकदा वाचले, प्रश्नोत्तरे पाठ केली तरी परीक्षेच्या वेळी अचानक त्यांना काहीच आठवत नाही आणि उत्तरे लिहिता येत नाहीत. म्हणून काही मुले दुसऱ्या मुलाच्या उत्तरपत्रिकेत पाहून उत्तर लिहितात किंवा कॉपी करण्यासारख्या गैरमार्गाचा अवलंब करतात.

निरनिराळे विषय वर्क कार्डाच्या आधारे शिकण्याची मुलांना गोडी लागावी यासाठी आम्ही बराच प्रयत्न केला.  त्यात आम्ही पुढील गोष्टींचा समावेश केला: चित्रांच्या जोड्या लावणे; शब्दांच्या व वाक्यांच्या जोड्या लावणे; रिकाम्या जागा भरणे; खरे की खोटे; विसंगती ओळखा; बहुपर्यायी प्रश्न; दिलेल्या अक्षरातून शब्द आणि दिलेल्या शब्दांतून वाक्ये बनवणे; शब्दकोडे; एका शब्दात उत्तर देण्याचे प्रश्न; थोडक्यात उत्तरे देणे वगैरे.

नमुन्यासाठी ४थ्या व ५ व्या इयत्तेतील मुलांसाठीचे वर्क कार्ड दिले आहे:

### **१. पर्यायी उत्तरे असणारे प्रश्न:**

अनंतपुर जिल्ह्यात अनुसूचित जमातीच्या लोकांची संख्या आहे

अ)३ लाख  ब) ५ लाख  क) २ लाख  ड) माहित नाही

### **२. खरे की खोटे:**

अनंतपुर जिल्ह्यात अनुसूचित जमातीचे  ५ लाख लोक राहतात

हो/ नाही/ माहित नाही

### ३. जोड्या लावा:

| | |
|---|---|
| अनुसूचित जातीच्या  ५ लाख व्यक्ती | मदकाशिरा गावात आहेत |
| अनुसूचित जातीच्या  १००० व्यक्ती | अनंतपुर जिल्ह्यात आहेत |

### ४. रिकाम्या जागा भरा:

अनंतपुर जिल्ह्यात ---------लाख अनुसूचित जातीचे लोक राहतात.

किंवा अनुसूचित जातीचे ५ लाख लोक ------- जिल्ह्यात राहतात.

### ५. सर्वसामान्य प्रश्न:

तुमच्या गावाबद्दल /अनंतपुर जिल्ह्याबद्दल १० वाक्ये लिहा.

अनुसूचित जाती/ दुष्काळ/ पेन्नार नदी यावर १० वाक्ये लिहा.

### ६. खालील वाक्यांचा योग्य क्रम लावून गोष्ट तयार करा:

रामप्पा अनुसूचित जातीचा आहे.

रामाप्पाला एक अस्वल दिसले.

रामप्पा जंगलात गेला होता.

अस्वलाने त्याला  हुंगले आणि ते निघून गेले.

रामप्पा मेल्याप्रमाणे जमिनीवर पडून राहिला.

आम्ही प्रत्येक धड्याचे लहान विभाग करून प्रत्येक विभाग शिकवण्यासाठी ५-१० मिनिटे घेत असू. त्यानंतर मुलांना वर्क कार्ड दिली जात. पाठांतर टाळण्यासाठी धड्यातील महत्त्वाची वाक्ये घेऊन निरनिराळे प्रश्न बनवले जात. काही वाक्यांचा उपयोग जोड्या लावण्यासाठी, खरे की खोटे यासाठी, बहुपर्यायी प्रश्नांसाठी किंवा उत्तरे लिहिण्यासाठी... केला जाई. सुरुवातीला हे थोडे कठीण होते, पण एकदा मुलांना याची सवय झाल्यावर आपली वर्क कार्डे घेऊन ते आपण होऊन अभ्यास करू लागत.

आमचे ध्येय आम्हाला पूर्ण करता आले. गतिमंद मुलांच्या लिहिण्या-वाचण्याची पातळी सुधारण्यात आम्हाला यश आले. ३ महिन्यांच्या कालावधीतच नवशिक्या गटातील अर्धी मुले सर्वसाधारण गटात जाण्यायोग्य झाली आणि सर्वसाधारण गटातील अर्धी मुले प्रगत गटात गेली. राहिलेल्या अर्ध्या मुलांना सुधारण्यासाठी कमीत कमी ६ महिने लागले. बाबूसारख्या काही थोड्या मुलांना वरच्या गटात जाण्यासाठी पूर्ण १ वर्ष लागले.

काही मुले अतिशय ढ असतात, काही ढ असतात तर काही गतिमंद असतात. हे वास्तव आहे. परंतु प्रत्येक मूल हुशार आणि निर्मितिक्षम असते असा माझा अनुभव आहे. बरेचजण सुधारू शकतात. बरेचजण स्पर्धा करू शकतात. शिक्षणासाठीचे वातावरण, वैयक्तिक लक्ष व प्रोत्साहन यांच्या अभावामुळे ते शिक्षणात मागे पडतात. गट पद्धतीसारखी शिकवण्याची योग्य पद्धत, धड्याचे लहान लहान भाग, वर्क कार्डे वगैरेंचा वापर केल्यास ५० ते ७५ टक्के गतिमंद मुले शिक्षणात प्रगती करू शकतात.

अनुसूचित जाती-जमाती आणि मागासवर्गीय मुलांच्या शैक्षणिक प्रगतीसाठी काम करण्याची दुर्मिळ संधी मला मिळाली म्हणून मी समाधानी आहे. मला त्याचा अभिमान वाटतो. मी सर्वांचा आभारी आहे.

# रघुबाबू

जन्म: १९५६

सध्या: कलाकार, कवी.

पर्यायी शिक्षणपद्धतीचे सल्लागार ('सेंटर फॉर रुरल स्टडीज एंड डेव्हलपमेंट' या संस्थेत कार्यरत)

यापूर्वी: १९७९-८२ अनंतपुर येथील बालनाट्य व बालकलांशी संबंधित 'बालविकास' या संस्थेचे समन्वयक.

१९८३-८६, ८९-९४ अनंतपुरच्या रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट मध्ये सहाय्यक शिक्षण संचालक (प्रशिक्षण व मूल्यमापन)

१९८६-८७ बंगलोर येथील 'एक्शन एड' साठी अभ्यासपुस्तके तयार केली.

१९८७-८८ नेलोर जिल्ह्यातील पल्लीपाडू येथे सृजनस्कूल

१९९४-९७ 'क्राय' या संस्थेची अभ्यासवृत्ती

१९९५-९९ डेक्कन डेव्हलपमेंट सोसायटी, पास्तापूर, जिल्हा मेडक येथील 'पच्चा साले' येथे अभ्यागत शिक्षक व प्रशिक्षक

१९९९ स्वयंसेवी संस्थांतील स्वयंसेवक/शिक्षकांचे प्रशिक्षण; लेखांचे लिखाण, कलाकार या नात्याने अविष्कार.

संपर्क: मोबाईल: ९४४१९५७२१२

इमेल: babu.rg@rediffmail.com

grkumarbabu@gmail.com